


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








# दीपावली

साहित्य
कला
संस्कृति




## श्रेयनामावलि





संपादक-मुद्रक-प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल**. दलाल आर्ट स्टुडियो ४०-४२ केनेडी ब्रिज मुंबई नं. ४. प्रत्येक प्रतीस किंमत रु. १. अधिक रजिस्टर पोस्ट ५० नवे पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी-अंकासह रु. १२॥ या अंकांत प्रसिद्ध झालेली मतें चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाहीं. 

दलाल आर्ट स्टुडिओ ४२ केनेडी ब्रिज मुंबई ४







आश्विन शके १८८२ ऑक्टोबर १९६०



# 'प्रेमयोगिनी मीरा'

भगवान उद्धवाला सांगतात, "उद्धवा, आतां तुला संतांची लक्षणें सांगतों तीं ऐक. संत हा दयाशील, निद्रोही, तितिक्षु, सत्यप्रतिज्ञ, निंदादिदोषांपासून रहित, सुख-दुःखादि द्वंद्वांना समान मानणारा, परोपकारी, विषयांपासून अविचल, जितेंद्रिय, कोमल अंतःकरणाचा, पवित्र, अकिंचन, निष्काम, मिताहारी, शांत, स्थिर, भक्त, मननशील, सावधान, गंभीर, धीर, षड्रिपूंना जिंकलेला, लोकांना मान देणारा, मित्र, दक्ष, करुण व ज्ञापक असा असतो!"

भगवंतांनीं उद्धवाला सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त असे शेंकडो संत आपल्या या भरतखंडांत होऊन गेले. परात्पर गुरु भगवान वेदव्यास, नारद, वाल्मिकी, विश्वामित्र, दत्तात्रेय, शुक्राचार्य, दधीची भरद्वाज, मार्कंण्डेय आदि त्रिकालज्ञ, भरत, ध्रुव, निमि, इक्ष्वाकु, रन्तिदेव, अंबरीष, रुक्माङ्गद, हरिश्चन्द्र, दिलीप, रघु, जनक, दशरथ, भीष्म, युधिष्ठिर, बुद्ध आदि राजे व श्री सिद्ध मत्सेन्द्रनाथ, श्रीगुरू गोरखनाथांपासून, श्रीपाद श्रीवल्लभ, श्री नृसिंहसरस्वती, श्री चक्रधर, ज्ञानेश्वर, नरसी मेहता, तुलसीदास, सूरदास, भानुदास, जनार्दन, एकनाथ, रामदास, तुकाराम आदि संत पुरुषांनी भागवत धर्माचें गुह्य वेगवेगळ्या प्रकारांनी सुलभ करून सांगितलें व मोक्ष प्राप्तीचा मार्ग दाखवला. परंतु केवळ पुरुषवर्गानेंच हें कार्य केलें असें नव्हे; तर भारतीय स्त्री रत्नांनीदेखील संत पदवी पावून आपलें नांव अमर करून ठेवलें. संध्या, अरुंधती, देवहूती, मदालसा, सुलभा, मैत्रेयी, गार्गी, सावित्री, अनसूया, शांडिली, गौतमी, द्रौपदी व धर्मपत्न्यांपासून मुक्ताबाई, जनाबाई, कान्होपात्रा, सखूबाई इत्यादि साध्वींनीं त्यांत अनेक प्रकारें भर घातली, व भागवत धर्माची इमारत विस्तारून ठेवली. त्यासाठीं त्यांना अनेक आपदा भोगाव्या लागल्या. देहदंडन सोसावें लागलें; परंतु त्यांनी ध्येयाकडे पाठ केली नाहीं.

मेवाडच्या प्रेमयोगिनी साध्वी मीराबाईचें चरित्र देखील विलक्षण आहे. मेडताचे राठोड रतनसिंहाची ही कन्या व ज्यांनीं जोधपूर वसवलें त्या जोधाजीची ही पणती. राजघराण्यांत जन्म घेतला खरा; पण पूर्वजन्मीं आपण श्रीकृष्णाची प्रिय सखी होतों याचें तिला स्मरण झालें आणि ध्यानीं, मनीं, स्वप्नीं, आसनीं, भोजनीं, शयनीं केवळ श्रीकृष्ण आणि श्रीकृष्ण, याशिवाय तिला कांहीं दिसेनासें झालें. राजघराण्यांत जन्म, चुटकीसरशी सर्व सुखविलास हात जोडून पायाशीं उभे, असें असतांना श्रीहरि-चरणीं सर्वात्मसमर्पण करून तिनें आपलें नांव प्रातःस्मरणीय, चिरवन्दनीय करून ठेवलें. जणुं निष्ठावंत प्रेमभावनेची ही सजीव मूर्ति. प्रेमाच्या परम सौन्दर्याचें, उत्कट माधुरीचें रहस्य उलगडून दाखवायलाच तिचा जन्म झालेला होता.

तिच्या विवाहासंबंधींच्या गुप्त मसलती तिच्या कानावर आल्या तेव्हांच अगदीं आवर्जून तिनें आपल्या पित्याला सांगितलें होतें—

'माझा पति, माझं सर्वस्व तो भगवान श्रीकृष्ण आहे. मी सर्वस्वीं त्याची आहे. त्या भक्तवत्सल गोपालाशिवाय मीं दुसरं कांहीं मानत नाहीं!'

वडिल माणसें तिला मूर्खांत काढीत. आणि एक दिवस राठोड रतनसिंहानीं मीरेचा विवाह उदेपुरच्या महाराजकुमार भोजाशीं मोठ्या थाटामाटानें करूनहि टाकला; पण मीरेचा अनंत संबंध सम्राटांच्याहि सम्राटाशीं झालेला होता. त्यामुळें जबरदस्तीनें लादलेला हा संबंध फार दिवस टिकूं शकला नाहीं. थोड्याच कालावधीनें राजकुमार भोजानें इहलोक सोडला.

जें घडलें. त्यामुळें मीरेला दुःखहि झालें नाहीं, सुखहि झालें नाहीं. ज्याच्यावर ती अपरंपार प्रेम करीत होती, त्यानें आपली म्हटल्याचा साक्षात्कार तिला झाला होता. सारी बंधनें सारे संबंध ही केवळ प्रभूची माया असून त्या मायेचा नियंता आपल्याला सांपडला आहे. या उत्साहांत ती सदा मग्न राही; त्यांतच एका साधु पुरुषानें गिरिधर गोपालाची एक सुंदर मूर्ति तिला भेट म्हणून दिली. प्रत्यक्ष

(पान १० वर चालू)








प्रेमयोगिनी मीरा

बसौ मेरे नैननमें नँदलाल ।
मोहनि मूरति, साँवरि सूरति नैना बने रसाल ।।
मोर-मुकुट, मकराकृत कुंडल अरुन तिलक दिये भाल ।।
अधर सुधारंस-मुरली राजति, उर बैजंती माल ।।
छुद्रघंटिका कटितट सोभित नूपुर-शब्द रसाल ।
मीरा प्रभु संतन सुखदाई, भगतबच्छल गोपाल ।।

— **मीराबाई**



# नागर नारायण

— राजा बढे

### सर्ग ७ वा

प्रियकरास भेटाया निघती तिमिरीं अभिसारिका
वाट उजळुनी लांछन आणी छळतो ग सारखा
चंद्र चोरटा येउनि गगनीं दिमाख दावित जना
करी बाई ग गुपितें उघडी एकांतीं मीलना
दिगांगनांच्या दिसे आननीं चंदन बिंदूपरी
सदाच मिरवी कलंक तिलका पातक बसलें शिरीं
हा चंद्र सखे पुनवेचा
वैरीच गमे गणिकेचा
प्रियकरास भेटाया लपुनी
घन अंधारी जाता जपुनी
हळूंच येई हांसत गगनीं
खोडसाळ जन्माचा
लांछन लेवबि कलंक मिरवी
प्रीती गुपितें जगास कळवी
चोर चांदणें मनांत भरवी
चंदन तिलक दिशांचा
कालिंदीच्या जललहरीवर
शीतकौमुदी पसरी निर्भर
वृंदावनिचा फुलवी परिसर
सिंधू रजतरसाचा
शशिबिंब ते गगनीं जसें येई वरी हरिणावरी
होता विलंब तुला जरा व्याकूळ हो हरिणीपरी
नयनीं उभी ती आसवें पुसते सख्या वरचेवरी
आक्रंदत ती मूर्च्छिता पडते पद्म धरणीवरी

**प्रबंध १३ वा**—(राग : गौड मालव. ताल : प्रतिमंठ)

सखि विफल विफल ग यौवन हे
मुसमुसले फुलते नदन हे !
लटकेंच मजसि कथिलेंसी, ये माधव कुंजवनासी
कां सये हसुनि फसवीसी अशि वैरिण कां ग होसी
विफल गमे ग रतिरंगाविण
रसरसलें हें फुलते यौवन
रसाल हे मोहरले मधुवन
ललितलवंगलतेसी। अशि वैरिण०
वदला मजसी येइन म्हणुनी
वाट बघूं किती भरल्या नयनीं
अश्रुफुलांची ओढित स्मरणी
नच अजुनि येइ हृषिकेशी ! अशि०
विसरलास का हरिवचनाला,
कसें आवरूं बाइ मनाला
जाउं तरी गे शरण कुणाला
मरण तरि न कां देसी ॥ अशि०
प्रीतीच्या या वसंतरातीं
अंधारांतुनि सोडुनि भीती
चोरुनि आलें वनिं एकांतीं
तुजसी भेटायासी ॥ अशि०
भार तनूवरि हार रुपे ग
मदनशरांची शेज खुपे ग
चन्द्र चावरा हसे लपे ग
मेघांतुनि हिणवीसी ॥ अशि०

अनुक्रमणिका

अग्निवलय ही करीं कंकणें
नागिण विळखे पायि पैंजणें
लावण्याचें लालस लेणें
रुचे न कांहि मनासी ॥ अशि०
कोण गडे ग ती भाग्यवती
रमली रातीं हरीसंगती
अभागिनी मी झाले पुरती
वंचिताच वनवासी ॥ अशि० ॥
झालें माझें मन हें चंचल
गालीं रुळती चुकार कुंतल
सावरितां ही उडवी अंचल
लाज न या पवनासी ॥ अशि० ॥
सुगंध जाळी जीव भावना
साहुं कशी या मदनवेदना
येइ माधवा माझ्या रमणा
बांधुनि घे करपाशी ॥ अशि० ॥
कुसुम कोमला मधुर भाषिणी
रसिक वल्लभा रमवी रमणी
कविता वनिता नत हरिचरणी
कवि जयदेव विलासी ॥ अशि० ॥

(प्रबंध १३ वा समाप्त)

× × × ×

माझा चन्द्र मला मुकला
कसा संकेत सखे चुकला
अंधारीं या वेतस कुंजीं वाट काय भुलला...ग
कसा गडे ग येइ न अजुनी काय कुठे रमला
मला शोधितां निबिड काननीं असेल ग थकला
मोहुनि कोणा व्रजसुंदरिच्या करपाशीं फसला
मजसि फसविलें देउनि वचनें कीं मजवरि रुसला
गोप सौंगड्यासवें खेळता भेटवेळ भुलला
किति आशेनें आले बाई डाव आज हुकला

\+ + + ×

येतां सखीतें पाहुनी ती एकटी कृष्णाविना
झाली अधोमुख मूक तो तिज बोलवेना भावना
आली कुणी युवती दुजी कृष्णासवें मनिं कल्पुनी
सवतीस बोले राधिका येईल तें ओठांतुनी

(प्रबंध १४)

(राग-वसंत. तालः—एकताल)

सांगतरी बाई, कोण ती सवत मला होई
रति समर उचित ही करि रणवेषा
गळति कुसुमदल विखरित केशा
विगलित वसना ही। कोणती सवत मला होई
कोण अशी ही सुगुण सुरंगा
चपलेपरि जी झिलगत अंगा
थरथरतें देही ॥ कोणती ॥
रमवी हरितें ही रसिकमना
अशी कोण यौवना अधिक गुणा
माधवास मोही ॥ कोणती ॥
आलिंगित तनुपुलक विकारा
चुंबित कुचयुग उरि मणि हारा.
चोरचकोर कुचाही ॥ कोणती ॥
कुंडल कानीं गालीं हलती
माजमेखला मणि किणकिणती
मंजुल तनुकंपाही ॥ कोणती ॥
लाजत हासत वचुनी नयनीं
कोकिलकूजित करि रतिशयनीं
कुजबुजतें काहीं ॥ कोणती ॥
पुलकभुजलता नश्वर अंगा
श्वासोश्वासें निववि अनंगा
पुरता विषयाही ॥ कोण ती ॥
श्रमजलभिजवी सुभगशरीरा
तरि ना शिणली रतिरणधीरा
दावित चतुराई कोण ती ॥
जयदेवाची मधुरा वाणी
रमवीरसिकां कलिमल हरुनी
पावन मन होई ॥ कोण ती ॥

–×–(१४ प्रबंध समाप्त)

हाय माझिया विरहव्यथेनें कांतिहीन जाहला
विकल माधवापरी दिसे हा शशांक कोमेजला
सदयहृदय हा चंद्र तोच ग, छळतो मजला असा
मदनचेतवी अंगांगांतुन कसा धरूं भरवसा ?

प्रबंध १५

(राग–गुर्जरी एकताल)

कालिंदितटिं कुंजवनीं हा खेळे रसरंग
रमणिसह रमला श्रीरंग
मदनवदन मदयंती मुदिता चुंबित अधरावरती
मृगमदतिलक ललाटीं शोभे, गगनीं चंद्रावरती
लांछनें पुलकित हो अंग.
रमणींचा हा हरिणथवा हरिभंवती करि लयलूट
विजयशालि गं शाममनोहर धीट काळवीट.
टोचित्रा दसंत मृगशृंग
रुचिरचिकुरत्रंधांत सुशोभित सुंदर तरुणानन तें
कुरबक कुसुमें तरलित चपला, अनंगमृगकानन तें
शुभांगी—
कस्तुरिलेपन स्तनयुग गगनीं नील निशा अवसेची
रतिचिन्हांची नखनक्षत्रें चंद्रकोर द्वितियेची
कोरिले कौतुक चतुरंग
मृणालमृदुला भुजयुगुलांवर करतल रातोत्पलें
मरकत कंकण मिलिंद वलयें मंजुल हिमशीतलें
गुंजती रसलालसभृंग

(पान ४४ वर चालू)







**सत्यं शिवं सुंदरम्**

• मराठी रंगभूमीचें हिडीस स्वरूप • तुमचा विश्वास बसणार नाहीं • दत्तो वामन पोतदार • डॉ. मोक्षगुंडम् विश्वेश्वरअय्या • आसाममधील प्रक्षोभ • ऑलिंपिकमधील भारताची ससेहोलपट

## मराठी रंगभूमीचें हिडीस स्वरूप

मराठी रंगभूमीची आजची कळा पाहिली म्हणजे रसिक महाराष्ट्राचें मन विषण्ण झाल्यावांचून राहत नाहीं. ज्या मराठी रंगभूमीवर बालगंधर्व, सरनाईक, रघुवीर सावकार, केशवराव भोंसले, बापुराव पेंढारकर, मा. दिनानाथ, चिंतामणराव कोल्हाटकर, नानासाहेब फाटक इत्यादि ख्यातनाम नट चमकून गेले व ज्या रंगभूमीची परंपरा व मांगल्य राखण्यासाठीं त्यांनीं अविश्रांत श्रम केले त्या रंगभूमीवर आज किरकोळ अपवाद सोडून दिले तर बाजारबुणग्यांचा धांगडधिंगाणा चालू आहे असें दिसतें. साहित्य संघ, ललितकलादर्श, नाट्यनिकेतन इत्यादि संस्था मराठी नाट्यकला जगविण्यासाठीं आपापल्यापरि झटत आहेत. पण नाटकांची आणि नटांची उणीव असल्यामुळें फक्त एकदोन यशस्वी नाटकांवरच त्यांना विसंबून राहावें लागत आहे. अशा परिस्थितींत मराठी रसिकवर्ग नाराज होऊन करमणुकीसाठीं बोलपटांकडे अधिकाधिक आकर्षित होत आहे हें सत्य नाकारतां येत नाहीं. मराठी रंगभूमीच्या ह्या सांघिक व धंदेवाईक प्रयत्नांना अपयश येत आहे हें पाहून कांहीं धंदेवाईक ठेकेदारांनीं निरनिराळ्या नांवाच्या विरुदाखालीं नटनट्या प्रसंगोपात्त जमा करून जुन्या नाटकांचे रटाळ प्रयोग लावून रसिकांच्या सहनशीलतेचा अंत पाहण्याचें ठरविलें आहे. आयत्या वेळीं रंगभूमीवर भरपूर मुशाहिरा घेऊन जमणारे नट व नट्या पूर्वी तालिमीसाठीं एकदांही न जमण्याची खबरदारी घेत असल्यामुळें एकसंधता व पाठांतर यांचा कसा विचका होऊं शकतो ह्याचा प्रत्यय असले खेळ पाहून परत जातांना शिव्या मोजणारे प्रेक्षक पाहिले म्हणजे येतो. असल्या कंत्राटी प्रयोगांसाठीं नामवंत नटांचीं नांवें जाहीर करून त्यांच्या अनुपस्थितीमुळें खेळ बंद ठेवावे लागल्याचेंही जाहीर आहे. अलिकडे ह्या ठेकेदार रंगभूमीचें जें स्वरूप दिसूं लागलें आहे तें मात्र अत्यंत हिडीस आहे. विशेषतः सिनेमानट्यांनीं नाटकांत कामें करायला सुरुवात केल्यापासून नाटकांचा तमाशा होऊं पाहतो आहे. नुकत्याच झालेल्या 'लग्नाची बेडी'च्या प्रयोगांत रश्मीचें काम करणारी कुणी नीलम नांवाची नटी आपल्या सिगारेट फुंकण्यानें रंगमंचावर धूराचीं वलयें निर्माण करून नॅचरल् अभिनयानें प्रेक्षकांनाही धूप घालत नव्हती. त्यांतल्या त्यांत रश्मि–कांचन–परागच्या प्रवेशांत तिच्या जोडीला काकाजी भाटवडेकर व बालक बालकराम हे आपल्या अभिनय कौशल्याची जोड देऊन रश्मीला कवेंत पकडण्याच्या अभिनयांत जी वास्तवता आणत होते ती इतकी कीं ह्या प्रवेशांत हें त्रिकूट समरस होऊन भूमिकेच्या व प्रसंगाच्या अवर्णनीय अभिनयांत ताल सोडून एकतानतेंत स्वैर विहार करूं लागलें होतें बिचाऱ्या सुसंस्कृत प्रेक्षकांनीं मात्र हें दृश्य पाहून माना खालीं घातल्या. नाटकाच्या अखेरिस सुसंबद्ध तत्त्वज्ञान सांगणारी अन्यांनी निर्माण केलेली रश्मी ह्या नाटकांत त्यापूर्वी ज्या थिल्लर वृत्तीनें वावरली तें खुद्द नाटककारानें पाहिलें असतें तर तोहि बिथरला असता. अन्यांच्या ह्या नाटकाचा आजकाल निरनिराळ्या नटवर्गाकडून जो तमाशा होत आहे तो जर ते पाहतील तर असल्या प्रयोगांना ते परवानगी देतील असें संभवत नाहीं. असल्या असंस्कृत नाट्यप्रयोगांवर सरकारच्या सेन्सॉरबोर्डानें करडी नजर ठेवून ते तत्काळ थांबवले पाहिजेत. नाहीं तर प्रेक्षकांच्या अभिरुचीला खालच्या पातळीवर नेऊन सोडणारे हे अभिनयपटु नट कोणत्या थराला जातील हें सांगतां येत नाहीं. चित्रपटांना 'फक्त प्रौढांसाठीं' म्हणून प्रशस्तिपत्रक देणारा सेन्सॉरबोर्ड ह्या प्रयोगांना हजर राहिले तर 'फक्त बाष्कळ नटांसाठीं' असेंच त्यांचें वर्गीकरण करून असले प्रवेश पडद्याच्या आंतच करण्याची परवानगी देईल. तमाशांना सोवळें करूं पाहणाऱ्या आमच्या मंत्र्यांनीं हे ओवळे तमाशे एकदां जरूर पहावेत. म्हणजे सुशिक्षित नट व अशिक्षित तमासगीर ह्यांच्यांत अधिक बीभत्स काय आहे हें त्यांना उमगेल. गडकरी, किर्लोस्कर, खाडिलकर इत्यादिकांच्या भावबंधन, सौभद्र, मानापमानसारख्या गाजलेल्या नाटकांचे जे आधुनिक प्रयोग होत आहेत ते पाहून ह्या नाटककारांनीं कल्पिलेल्या भूमिका आणि त्या दूषविणारे आजचे नायक व नायिका ह्यांच्या देहवेषभूषेचें कल्पकत्व पाहून त्यांचे तृप्त आत्मे बेचैन होऊन रंगभूमीला शापतील कीं काय असें वाटतें. शांता आपट्यांनीं घडवलेली लतिका पाहून गडकऱ्यांना आणि दीनानाथांना काय वाटत असेल ? आतां फक्त शारदेची भूमिका करावयाची तेवढी बाकी उरली



अनुक्रमणिका

आहे. नायलॉनच्या पारदर्शक पांचवारी पातळांत जर ही शारदा रंगमंचावर अवतरून ' कधीं करिसी लग्न माझें ' म्हणून समोरच्या प्रेक्षकांना विचारूं लागली तर थिएटर ओस पाडून पुढील प्रवेश गाळावे लागतील. असलीं अभिजात यशस्वी नाटकें दिवसेंदिवस ज्या वैशिष्ट्यपूर्ण अभिनयानें तगवलीं जात आहेत तें पाहून मराठी नाटक थिटें कां ह्याची कारणमीमांसा शोधण्यासाठीं संशोधकाला फार दूर जावें लागणार नाहीं. ह्या नाटकांनीं प्रेक्षकांना पुरेसें आकर्षित केलें नाहीं असें वाटून कीं काय, फार्स नांवाचे नवीन हास्यास्पद प्रयोग मराठी रंगभूमीवर आज सुरू झाले आहेत. चांगलीं नाटकें पाहून झोपीं गेलेल्या प्रेक्षकाला भलत्या ठिकाणीं गुदगुल्या करून जागा करण्याचें हें प्रयत्न आणि त्यांचा अवास्तव गौरव करणारे प्राध्यापक गुरुवर्य ह्यांनीं मराठी रंगभूमीला नवे वळण लावण्याचा जणु विडा उचलला आहे असें दिसत आहे.'चोरावर मोर' आणि 'माकड आणि पाचर ' हें त्यानंतरचे नाट्यप्रयोग तर सूचक बीभत्सलेला अधिकाअधिक प्रगट करूं पाहताहेत असें वाटतें. अशा प्रयोगांत दिग्दर्शक आपल्या व्यक्तिगत मनोगंडासाठीं नटनटींच्या तोंडच्या सूचक उद्गारांना बाष्कळ अभिनयाची जोड देऊन प्रेक्षकांना नवनाट्याचे जे धडे देऊं पाहत आहेत ते बघून मराठी रंगभूमी कुठें चालली आहे ह्याचा प्रत्यय येतो. आज पाश्चात्य रंगभूमीवरही फार्सचे प्रयोग होत आहेत. पण त्यांची पातळी ह्या मराठी फार्सइतकी खालीं आलेली नाहीं. थिट्या मराठी नाटकाला अधिक खोल कर्दमांत नेऊन बुचकळणारे बालिश नाटककार आणि त्यांच्यापुढें गौरवपूर्ण प्रस्तावनेचें गाजर धरणारे प्राध्यापक ह्यांच्या परस्पर-प्रशंसक समन्वयानें मराठी रंगभूमी खऱ्याखुऱ्या अर्थानें पिला हाऊसवर येऊन ठेपली आहे हें रसिक प्रेक्षकवर्गाला अजून उमगत नाहीं हेंच खरें दुर्दैव.

### तुमचा विश्वास बसणार नाहीं

' फिल्मइंडिया'च्या सप्टेंबरच्या अंकांत 'मराठी रंगभूमीचें अतुल्य रत्न ' म्हणून शांता आपटे ह्यांच्या स्तुतिपर सुमारें सतराशें शब्दांचा मजकूर छापून आला आहे हे कुणाला सांगूनहि खरें वाटणार नाहीं. ह्या

# राष्ट्रीय विकास योजनेंत रबर धंद्याची वाढ

आधुनिक युगांत आपल्या दैनंदिन जीवनांतच नव्हे तर राष्ट्राच्या संरक्षणकार्यांतहि रबर ही एक महत्त्वाची वस्तु बनलेली आहे. आपल्या देशांत रबराचे उद्योगधंदे स्वातंत्र्योत्तर काळांत फारच झपाट्यानें वाढत आहेत. गेल्या तेरा वर्षांत रबरी मालाचा खप सालिना तेरा हजार टनांपासून पन्नास हजार टनांपर्यंत वाढलेला आहे आणि प्लॅनिंग कमिशनच्या अंदाजाप्रमाणें तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या अखेरीस हा खप सालिना एक लाख टनांपर्यंत वाढेल. या सगळ्या मालाचें उत्पादन आज अस्तित्वांत असलेल्या रबर कारखान्यांनी करावयाचें म्हटलें तर प्रत्येक कारखाना तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत दुपटीने वाढणें आवश्यक आहे.

दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत जें उद्दिष्ट ठेवण्यांत आलें होतें तें साध्य करण्याच्या कामीं ' स्वस्तिक ' ने हातभार लावलेला आहे. ह्या कालावधींत ' स्वस्तिक ' कारखान्याची खरें म्हणजे चौपटीने वाढ झालेली आहे. यापुढें कारखान्याच्या विकासाचा असाच वेग चालू ठेवणें सहज शक्य नसलें तरी तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत या कारखान्याची वाढ निदान दुपटीने तरी करण्याचा 'स्वस्तिकचा' निश्चय आहे. ही वाढ अपरिहार्यच आहे. कारण आज ज्या ग्राहकांना ' स्वस्तिक ' आपला माल पुरवीत आहे ते ग्राहक आपापल्या कार्यांचा व्याप विविध तऱ्हेने वाढवीत आहेत आणि त्यांच्या वाढत्या गरजा भागविण्यासाठीं ' स्वस्तिक ' ला आपला विकास दुपटी-तिपटीने करणें आवश्यकच आहे. याशिवाय दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या शेवटच्या वर्षांत ज्या उपक्रमांना सुरवात झाली ते यापुढें चालू राहणार असल्यामुळें ' स्वस्तिक ' चा व्यापार साहजिकच अधिक वाढत राहील.

' रबर लॅटेक्स ॲड्हीजिव्ह् ' तयार करण्याचा आणि त्याची यंत्रसामग्री आयात करण्याचा परवाना स्वस्तिक कारखान्याला यंदा मिळालेला आहे. या मालाचें उत्पादन १९६१ सालीं सुरू होईल. प्लॅस्टिक केबल तयार करण्याचा परवाना नव्याने मिळाला असून त्याचें उत्पादन करण्याचें कामहि लवकर सुरू होईल. टेक्स्टाईल कोट्स् आणि ऐप्रन तयार करण्याची मशिनरी या वर्षा अखेर हाती येईल. आणि त्यामुळें तिसऱ्या पंचवार्षिक योजनेंतील उद्दिष्टापेक्षां अधिक पल्ला गाठतां येईल. स्वस्तिकचा माल अधिकाधिक लोकप्रिय होत आहे. कारण त्याचा दर्जा, किंमती, वेळेवर मालपुरवठा आणि ग्राहकांची सेवा तत्परतेने बजावणें या बाबींकडे ' स्वस्तिक ' चे चालक अत्यंत जागरूकतेने लक्ष देतात. आमचे संतुष्ट ग्राहकच आम्हांला आमचें उत्पादन दुपटी-तिपटीनें वाढविण्यास आणि आमच्या राष्ट्रीय योजनेंत यशस्वी रीतीनें कामगिरी पार पाडण्यास उत्तेजन देत आहेत.

( स्वस्तिक रबर प्रॉडक्ट्स लि., पुणें ३. यांचेतर्फें प्रकाशित. )

बाबुराव पटेलांनीं ह्याच ख्यातनाम नियतकालिकांत ह्याच शांता आपट्यांची कांहीं वर्षापूर्वी बदनामी केली होती. म्हणून ह्याच शांता आपट्यांनी ह्याच बाबुराव पटेलांना छडीचा प्रसाद देऊन कुंकूमधील नीरेच्या भूमिकेचा अभिनय कृत्रिम नव्हता हें कसें पटवलें होतें, हें मराठी वाचकांच्या स्मरणांत अजून असेलच. अलिकडे माळकरी बनून दवादारू विकणारे गोरागांधी बाबुराव पाहिले म्हणजे त्यांचे हें नवीन परिवर्तन सुसंगत वाटतें. म्हातारपण आलें कीं माणसाची प्रवृत्ति स्वाभाविकपणें मवाळ होऊं लागते आणि 'झालें गेलें विसरून जा' या न्यायानें तो आपल्या तत्त्वांशीं तडजोड करूं लागतो. शांता आपटे ह्यांचा अभिनय किती चांगला आहे ह्याचा पटेलांना एकदम साक्षात्कार झाला असें प्रस्तुत लेखावरून वाटतें. शांता आपटे ह्यांचें नेत्रदीपक व्यक्तिमत्व आणि अद्वितीय अष्टपैलुत्व ह्याचा प्रत्यय बाबुरावांना नाट्योदयतर्फे झालेल्या स्वयंवर, एकचप्याला आणि भावबंधन या नाटकांनीं आणून दिला असें त्यांनीं प्रस्तुत लेखांत म्हटले आहे. सिंधु, लतिका आणि रुक्मिणी ह्या तीन विशिष्ट प्रकारच्या भूमिका शांता आपटे यांनीं इतक्या वैशिष्ठ्यपूर्ण कलात्मकतेनें केल्यामुळें बालगंधर्वांच्या ऐन अमदानीच्या नाट्यगुणांना ग्रासून टाकणाऱ्या या कलावंताचे किती कोडकौतुक करून त्याला कुठें ठेवूं असें बाबुराव पटेलांना वाटूं लागलें आहे. "बालगंधर्व देखणे असतील. ते स्त्रीभूमिका त्या काळीं नैसर्गिक करत असतील. पण शांता आपटेच्या बाबतींत प्रेक्षकांना आपल्या कल्पनाशक्तीला ताण देऊन आंबटशोकांत मश्गूल होण्याची जरुरी भासत नाहीं. शांता आपटेचें हें व्यक्तिमत्व म्हणजे सर्वांगीण सौन्दर्याचा आणि रसाळ परिपक्वतेचा घवघवीत साक्षात्कार होय" असें त्यांनी पुढें म्हटलें आहे. ह्या सौन्दर्याचें रसपान करतांना बाबुराव इतके वाहवत गेले आहेत कीं त्यांनी बालगंधर्वांची आणि शांता आपटेची अधिक सर्वांगीण चर्चा करण्यांत स्तंभ खर्ची घातले आहेत आणि ह्या आरतीसाठीं त्यांना शब्दसुद्धां तोकडे पडूं लागले आहेत असें वाटतें. ह्या तुलनात्मक व्यक्तिचित्रणानें बालगंधर्व शांता आपटेपेक्षां कितीतरी तोकडे आहेत व त्यांच्या नाट्यगुणांचा उगाच एवढा गाजावाजा झाला आहे हें त्यांनीं पटवून देतांना जिवाचें रान केलें आहे. "अभिजात नाट्यकलेच्या निकषांनीं तपासले तर गंधर्वांना सूक्ष्म व सर्वांगपरिपूर्ण अभिनय अज्ञातच होता. याउलट शांताबाईंनी आपल्या भूमिकांनीं शब्द आणि अभिनय यांचा जिवंत समन्वय प्रेक्षकांच्यासमोर उभा केला आहे. बालगंधर्वांचें संगीत कंटाळवाणे होतें, तें ग्रामोफोनच्या तबकडींतून बाहेर पडणारें निर्जीव कर्णकटु वाटत असे. तें भावनांना हेलकावणारे नव्हतें. तें फक्त कानांवरच क्षणिक परिणाम करीत असे. शांता आपटेच्या सर्वांगपरिपूर्ण व्यक्तिमत्वांत ह्या सर्व वैगुण्यांचा अभाव आहे आणि त्यामुळें त्या बालगंधर्वांपेक्षां अधिक श्रेष्ठ आहेत. ह्या गुणी नटीची सरकारनें दखल

(पान ४८ वर)

(पान ४ वरून चालू)

परमात्माच मूर्त स्वरूपांत आपल्याला गवसला या आनंदानें ती चिन्मात्रस्वरूप झाली. बाहेर आपदा आक्रांत स्वरूप घेऊन उभ्या आहेत याची तिला तिळमात्र जाणीव नव्हती. राजघराण्याची मर्यादा उल्लंघून श्रीकृष्णाच्या मंदिरांत ती जाऊं लागली. तिथें बेभान होऊन लोकांसमोर नाचूं लागली; परंतु लब्धप्रतिष्ठितांना तें सहन झालें नाहीं. त्यांनीं तिला वेड्यांत काढलें आणि नाना तऱ्हेच्या अफवा पसरायला सुरुवात केली. आधींच पांढऱ्या पायाची म्हणून तिच्यावर शिक्का बसला होता; मग काय विचारतां—लोकसागराचें तोंड कां बांधतां येणार?—तिच्यावर वेडी, शिंदळी, बाहेरख्याली, कामिनी, अभिसारिका इत्यादि आरोपांची खैरात करण्यांत आली व सासरच्या लोकांनीं त्यांत आपला सूर मिसळून दिसेल तिथें तिचा पाणउतारा करण्यांत येऊं लागला;- पण तिची स्थितप्रज्ञ वृत्ति अचल राहिली. लोकांच्या संपर्कापासून शक्यतों दूर राहण्याकरितां ती दिवसभर स्वतःला कोंडून घेई आणि रात्रीची हरिमंदिरांत जाऊन गाभारा बंद करून प्रभूशीं प्रेमालाप करीत बसे. झालें. लोकांनीं तिला वेश्याच ठरवून टाकली; यावर तर्कवितर्क करून आपल्या पोटीं असली कुलांगार दिवटी निपजावी आणि तिनें दोन्ही कुळांना बट्टा लावावा हें राठोड रतनसिंहाना सहन झालें नाहीं. त्याने तिचा नाश करण्याची प्रतिज्ञा केली; उघड रीतीने तो करणें सोपें नव्हते. त्यासाठीं नाना तऱ्हेचे गुप्त प्रयत्न सुरू झाले. पण मीरेचे कांहींहि नुकसान झालें नाहीं आतां तर तिनें मंदिरांतच मुक्काम केला. स्वजनद्रोहाची तिला पर्वा नव्हती. एके दिवशीं रतनसिंहानीं एक जहरी काळा नाग पेटाऱ्यांत घालून तिला भेट म्हणून मंदिरांत पाठवला, मीरा उघडून पाहाते, तों शंख चक्रादि चिन्हांनी युक्त असा दुर्मीळ शाळिग्राम आपल्याला पित्यानें पाठवलेला पाहून तिनें तो हृदयाशीं धरला. आणि पित्याला धन्यवाद कळविले! राठोडानीं ममत्वाचें ढोंग करून विषानें भरलेला चषक उपवास सोडायच्या वेळीं पाठवून दिला; परंतु भगवंतांनी तो अमृतासमान करून आपण त्याचा अधिकारी झाला.

बाहेरून दिसायला लोकापवादानी खिन्न झाली म्हणून; पण वस्तुतः आपल्या प्राणेवल्लभाचें आमंत्रण आलें म्हणून सारी मोहमाया सोडून मीरेनें वृन्दावनांत प्रयाण केलें. तिथें तिला अज्ञात असें कांहीहि नव्हतें. पूर्वजन्मीं ती तिथें वावरलीच होती. आपल्या हृदयधनाला आळवण्यांत तिला दिवस पुरेनासा झाला. जिथें जिथें ती जाई तिथें तिथें लोक तिच्या चरणावर डोकी ठेवूं लागले. गोस्वामी तुलसीदासानी याच वेळीं तिला ग्रंथरचनेसाठीं आज्ञा देऊन उपदेश केला. पायांत घुंगरू बांधून हातांत करताळ व एकतारी घेऊन नववधूच्या रूपांत प्राणनाथ गोपालाच्या समोर नाचतां नाचतां भगवंतानीं —'मीरा के प्रभू गिरिधर नागरानें' तिला आपल्यांत विलीन करून घेतलें.

'नरसी जीका मायरा, गीत–गोविन्द–टीका, राग गोविन्द, राग सोरठ इत्यादि ग्रंथ प्रेमयोगिनी मीराबाईनी रचले आहेत असें म्हटलें जातें. मीरे सारखें सोज्वळ, गहन, निष्ठावंत भक्ति–प्रेमाचें प्रतिक संत मंडळींत दुसरें नाहीं. एकनिष्ठ प्रेमाचा अफाट महिमा आपल्या अभंगांतून तिनें ठायीं ठायीं वर्णिलेला आहे.

—गोपालकृष्ण



*आजचीं सकाळ पुन:पुन्हा तिच्या डोक्यांत थैमान घालीत होती. सकाळचा तो कांटा तिच्या मनांत सारखा सलत होता. पण इतकं चिडण्यासारखं, संतापण्यासारखं त्यांत काय होतं ?*

# भोळी

—सौ. अंजलि ठकार

गुढघ्यावर हनुवटी टेकून खुर्चीवर बसलेली ऊर्मिला निर्विकारपणें मुलांकडे पहात होती—मुलें माठांतल्या पाण्याशीं खेळत होतीं. पण रागवायला तिच्या डोळ्यांत जोरच नव्हता. तिचें चित्तच थाऱ्यावर नव्हतें. किती संतापून आज उमेश ऑफिसांत गेला होता—तिच्यामुळें... मोजे सांपडले नाहींत् म्हणून दूर भिरकावलेले बूट—उलटे पालटे पडलेले. रिस्टवॉचहि टेबलावरच विसरलेलें दिसत होतें. उमेशच्या संतापानें घराची केलेली ही दशादशा पाहून तिला अगदीं भडभडून आलें. पुन्हां तिला वाटूं लागलें—सहज आपण विचारायला गेलों अन् उमेश इतका कां चिडला...

तेवढ्यांत दरवाजांतनं ठुसे येतांना तिला दिसली. ऊर्मिलेला अगदीं चोरट्यासारखें झालें. नेमकें आजच यायला कसें फावलें हिला तरी—

पण ठुसे गडबडीनं विचारत होती—“ आंब्याची पेटी आलीय् दारावर—घ्यायचेत् कां तुला ? ”

पण ऊर्मिला घाईनें तिला परतवीत म्हणाली, “ नको बाई—हे घरीं नाहींत—उगीच फसगत व्हायची—आपल्याला कांहीं त्यांतलें समजत नाहीं. ”

ऊर्मिलेला कळलें—ठुसे कुत्सितेनें हंसली अन् म्हणाली, “ त्यांत काय ? अग, तो सांगतोय् त्यापेक्षां खूप कमी भाव सांगायचा. चट् देतात गरज असली कीं. आणि हे तरी कुठें इथें आहेत—हे गेलेत दूरवर. ”

शेवटीं ठुसे तिचा हात ओढून म्हणाली, “ अग नुसते बघ तर खरे आंबे. ” बरीच घासाघीस करून शेवटीं ठुसेनें चांगले सोळा रुपयांचे आंबे घेतले. पट्कन् त्याला नोटा दिल्या आणि चलाखीनें क्षणांत सगळी चेंज मोजून घेतली. ऊर्मिलेला वाटलें, अशावेळीं आपली कोण धांदल उडाली असती—खरेखोटे पैसे आहेत कीं काय हें पाहाण्यांतच आपला एक तास गेला असता. नवरा दूरवर गेल्यावर इतक्या स्मार्टलि वागणाऱ्या त्या छाकट्या मैत्रिणीचा क्षणभर तिला हेवा वाटला. आपण मात्र जरा कुठें दाराला कुलूप लावून बाहेर गेलं कीं सारखी रुखरुख लागते—कुलूप नीट लावलंय कीं नाहीं—कडींत नीट घातलंय् कीं नाहीं. कांहींतरी बोलायचं म्हणून तिनें ठुसेला विचारलें,

“ कवें रोडलाच त्या देशपांडेचं सासर आहे ना ग ? जाऊं या का आपण एकदां तिच्याकडे ? ”

उजव्या हातानें ब्रेसियर्सचा कांठ चांचपीत कुत्सितपणानें ठुसे म्हणाली,

“ तिच्याकडे ना, गेलें होतें बाई एकदां. पण इतकीं अडाणी आहेत तिच्या घरचीं माणसं—फार बोअर झालें बाई मग. बोलायला कॉमन टॉपिक्स नसतात—मग भारी ऑकवर्ड होतं. ”

ऊर्मिलेच्या मनांत आलें, तसें पाहिलें तर मॅट्रिक आणि इंटर यांत कितीसें अंतर आहे ? आणि इंटरच्या अर्ध्या हळकुंडांत पिवळ्या झालेल्या ठुसेचें क्षणभर तिला हंसूच आलें. तिला वाटलें, अघळपघळ मराठींतून हंसत खिदळतं बोलतांना इंग्रजी शब्दांची साखर पेरणें वेगळें—आणि फर्डे इंग्रजी बोलणें वेगळें. ऑफिसातल्या ख्रिश्चन पोरींभोंवती गोंडा घोळतांना तरुण कारकुनांच्या इंग्रजीची कशी भंबेरी उडते त्याची गंमत उमेश तिला खूपदां सांगायचा. तो तिला नेहमीं म्हणायचा,

“ शिक्षणावर कांहीं नाहीं ऊर्मिला. सतत इंग्रजी वाचलंस तर तुलासुद्धां प्रॅक्टिसनं बोलतां येईल. ”

म्हणून एक दिवस तिनें मोठ्या चवीनें टाइम्स् वाचायला घेतला होता. पण इतके शब्द अडले कीं त्यांचे अर्थ बघतांबघतां एकहि कॉलम तिच्या लक्षांत येईना.

भर उन्हांत ठुसेच्या घरून आल्यानें तिचें डोकें चांगलेंच गरगरूं लागलें. डोकें इतकें शिणलें होतें—हलकें-हलकें होऊन







गेलें होतें. नकळत ती रेडियोपाशीं आली. बटन पिरगळतांच खर-खरून रेडियो पचकन् थुंकला —

" या ऽ ऽ ह्या या ऽ ऽ ह्या दिल ले गया..."

—काय हीं उघडीं वाघडीं गाणीं-ऐकवतात तरी कशी लोकांना—आणि अपराध्यासारखे तिनें स्टेशन बदललें. घरभर पसारा करून मुलेंहि कंटाळून झोंपलीं. तिला आणिकच सुनेंसुनें वाटूं लागलें. त्यांत घरावरची ती मघांचीच अवकळा पाहून तिला अगदीं भडभडून आलें.

आजची सकाळ पुन्हां पुन्हां तिच्या डोक्यांत थैमान घालत होती. दोन तीन दिवसांपूर्वीं तिनें ती नवीनच विषयावरची गोष्ट वाचली अन् तेंच तिच्या मनांत रात्रंदिवस घोळत होतें. म्हणून आज सकाळीं शेवटीं मनांतली ती मळमळ तिनें उमेशजवळ ओकून टाकली होती. चहाच्या कपबशा आवरतां, आवरतां ती त्याला म्हणाली होती,

" समजा हं, तुमची ती डंके .."

टॉवेलनें केस पुसतां पुसतां डोळे विस्फारून उमेश नुसता पहातच राहिला होता.

ऊर्मिला पुढें म्हणाली, " समजा ती डंके आपल्या घरीं आली तर तुम्हांला काय वाटेल ? तुम्ही कसे वागाल ? "

आणि हें बोलून टाकल्यावर मनावरचें एक ओझें उतरल्या-सारखें तिला वाटलें होतें.

उमेश उडत उडत पुटपुटला, " कांहीं तरीच...कांहीं तरीच काय विचारतेस ? "

पुन्हां धीर करून ऊर्मिला म्हणाली होती, " तरी पण...तरी पण काय वाटेल...? "

तो जरा सांवरून चिडखोरपणें म्हणाला, " पण ती येईलच कशी मुळीं आपल्याकडे—मुळींच येणार नाहीं ती. "

जीभ रेटून पुन्हां ऊर्मिलेचे शब्द बरळले......

" तरीपण—समजा रस्त्यांत भेटली—दिसली—तर...तर काय वाटेल...? "

मग मात्र तो भयंकर चिडला. संतापून तो म्हणाला होता, " पर-वांच्या मासिकांतल्या त्या गोष्टीवरनंच ना ?...खुळचटासारखं लोक लिहितात. अन् त्या कचऱ्यांतच तुमचंहि मन रमतं. सिनेमांतलं न् गोष्टींतलं—ऐकून सगळं सोडून द्यायचं असतं. आणि काय वाटाय-चंय् ग आतां ? घरांत आलों तेव्हां सगळं सगळं तुला सांगून मोकळा झालों—कांहींहि आडपडदा न ठेवतां. आणि तिलाहि चार लोकां-सारखी रोखठोक पत्रिका धाडली पोस्टानं. "

उर्मिला भेदरून म्हणाली होती,

" नाहीं हो—माझ्या मनांत तसं कांहीं नव्हतं, सहज विचारलं. उगीच आपलं वाटलं..." तिला वाटलं होतं तो लाडानं म्हणेल, " मी दाखवीन तिला माझा बाळसेदार संसार-माझी ही गोड सखी."

पण उमेश आणिकच भडकला होता.

" अग 'वाटलं वाटलं' म्हणजे काय ? कां उगीच डोक्याच्या चिंध्या उडवतेस ? दोन पोरं झालीं आतां—चल माझे मोजे दे हुडकून. "

आणि ती अगदीं गोरीमोरी झाली होती. लगेच तिला वाटलें—फार बोललों आपण...इतकं ओढून धरायला नको होतं. उमेशचें तरी म्हणणें खरेंच होतें. ती रागवेल, रुसेल असें वाटलें तेव्हां तिनें भलताच समंजसपणा दाखवला होता. त्याचें सगळें ऐकून घेतल्यावर ती म्हणाली होती, " प्रेम म्हणजे काय कोण जाणे...पण दादांबरोबर प्रथमच दाखवायला म्हणून तुमच्याकडे आलें आणि तुम्हीं मला फार फार आवडलांत. तितकंच तुमचं घरहि आवडलं. " सासूबाईंचें आरशासारखें सैंपाकघर, सेल्फमधला पितळी डब्यांचा सेट, चकचकीत बंब, कांचेच्या बरण्यांतून ओळीनें दिसणारें साखरांबे, गुळांबे अन् मोरावळा—अशा सुरेख घरची सून म्हणून आपण मिरवणार म्हणून ती अगदीं हुरळून गेली होती.

लग्नाच्या पहिल्यावहिल्या दिवसांत लाडांत येऊन ती त्याला म्हणाली होती,

" एका गांवांत असून यापूर्वी कधींच कसें हो आपण एकमेकांना पाहिलें नव्हतें ? बाजारांत—दुकानांत—रस्त्यांत—कुठेंच...? "

अन् तो चेष्टेनें म्हणाला होता,

" आम्हांला काय माहीत त्या बोळकांडींत एक गुलाबाची कळी आहे म्हणून ? नाहींतर टाकली असती एखादी चक्कर आमच्या सायकलनं...... "

माहेरच्या रस्त्याला बोळकांडी म्हटलेलें पाहून ती गुलाबाची कळी चांगलीच चपापली होती.........

पुन्हांपुन्हां आज सकाळचा कांटा तिच्या मनांत सलत होता. पण इतकं चिडण्यासारखं अन् संतापण्यासारखं त्यांत काय होतं ? इतकी कां उमेशची तरी क्षणाक्षणाला मसलत जावी—माझं असं सहज म्हणून सुद्धां मी कांहींच कां नाहीं दाखवायचं ? परवां नाहीं कां, तो आल्यावर म्हणाला होता,

" चला रे पोरांनो आज बागेंत जाऊं. "

—ती सहज म्हणाली होती,

" खरंच, ते बवें कधींचे बोलावताहेत—आज जाऊं या कां ? अनायासें तुम्हीहि लवकर घरीं आलांहात—"

कपाळाला आठ्या घालून तो म्हणाला होता,

" म्हणजे त्या अंधाऱ्या बोळकांडींतून त्यांच्या घरीं जायचं. चहाचं सॅच्युरेटेड सोल्यूशन प्यायचं, आणि सबंध संध्याकाळ त्यांच्या लग्नाळू मुलीच्या आयुष्याची चिंता करीत घालवायची—ना ? "

समजावणीच्या स्वरांत ती म्हणाली होती,

" तसें नाहीं—पण ही जागा त्यांच्यामुळेंच नाहीं कां मिळाली आपल्याला ? आपली कुठें नवीन ठिकाणीं ओळख होती...आणि मी आल्यापासून आपण गेलोंच नाहीं अजून. ते म्हणतील, जरूर होती तेव्हां दहादां आले..."

आणि तो एकदम भडकला होता—" अग जागा मिळवून दिली म्हणजे काय ? होती रिकामी म्हणून मिळाली. आतां काय माझ्या कातड्याचे जोडे घालूं कीं काय त्यांच्या पायांत ?—आणि प्रत्येक गोष्टींत तूं काय म्हणून इतकी गरीब गायीसारखी बोलतेस ? "

ती भेदरली होती. तिला वाटलें, आतां उत्तर दिलें तर मोठें वादळ होईल आणि वाळक्या पालापाचोळ्यासारख्या आपण कुठेंतरी होलपटत जाऊं...





ती अंग चोरून गप्प उभी राहिली तसा तो आणिकच भडकला, "कां तूं नको त्या लोकांचा विषय काढलास—चांगले बागेंत गेलों असतों—चल आतां त्या बर्व्यांकडे..."

ती भेदरून म्हणाली होती,

"नको नको...तसं नाहीं...आल्यापासून गेलोंच नव्हतों म्हणून सहज म्हटलं."

पण मनांत तिला टोचलें. वाटलें—बी. ए.ला असतांना कोण ती डंके कां लंके म्हणे प्रेम करीत होती—ऐकून घेतलें असतें कां असें तिनें? घातली असती कां खालीं मान?...तिला वाटलें—खूप संतापावें—ओरडावें—त्रागा करावा. पण स्वप्नांत ओरडावेंसें वाटलें म्हणजे जसा गळा दाबून धरल्यासारखे होतें तसें तिला वाटलें. वाटलें म्हणावें, "चुकलें." पण फाड्दिशी उडणारें तोफेसारखे वाक्य तिला ठाऊक होतें—

"चुकलें न् चुकलें...जन्मभर चुकाच करीत बसा—"

—वळिवाच्या वाऱ्याबरोबर आलेल्या केळीच्या वासानें तिला एकदम गरगरल्यासारखे झालें. रिक्षांतून उतरून या ब्लॉकमध्यें शिरतांना याच केळीच्या वासानें तिला हैराण केलें होतें. जागा पाहतांच तिच्या मनांत आलें होतें—छानच आहे...शिवाय कुटुंबवत्सल मालकांचा शेजार. तिच्या सुगरणीच्या चाणाक्ष नजरेनें सगळें क्षणांत टिपलें होतें. सोयी-गैरसोयी. उंबऱ्यांचा ओटा नव्हता. पण कपाटें चिक्कार होतीं. खालीं लाल लादी होती. बाथरूम स्वतंत्र पण लहानच होती. बंब कांहीं मावला नसता.....म्हणजे बंब रोज बाहेर पेटवायचा अन् रात्रीं घरांत आणायचा. आणखी एक कामांत भर! परसांत हिरवीगार केळ होती—फोंफावलेली. केळीच्या पानावर जेवायला तिच्या अंजूला फार आवडायचें. अंजूची आठवण येतांच तिच्या एकदम डोक्यांत आलें—पोरें केव्हांची बाहेर खेळताहेत.

पण कॉर्नरमध्यें खेळणाऱ्या अंजूला आणि राजूला हाताला धरून आणतांना मिनिटभर तिला रस्त्यांतच थांबावें लागलें. इतक्या 'हम्मा' एकदम पाहून अंजूच्या पोटांत आनंद मावत नव्हता. वर वळिवाचा वारा ढगांशीं झोंबत होता अन् पलीकडे सांज फुलली होती. तशा त्या ओल्या हवेंत गायींच्या गळ्यांतल्या घंटांचा आवाज ऐकून तिला अगदीं सुनेंसुनें वाटूं लागलें. राजूला गुटी घातल्यावर तो किरकिरला कीं तिची आई गाणें म्हणायची—

"घणघण घंटानाद
कुणीकडे घालूं साद
कुठें माझा यदूनाथ..."

तिन्हीसांजेसारखें तिचें मन कातर झालें. तिला आणिकच एकटें एकटें वाटूं लागलें—वरातीनंतर सःसरीं वाटलें होतें तसें. शेगडीवर आधण टाकून तिनें मुगाची डाळ न् तांदूळ धुतले. मोरींतला धुवणीचा तो उग्र वास जाण्यासाठीं चांगलें बादलीभर पाणी तिनें ओतलें. पण तो वास आणिकच घरभर घुमला आणि तिच्या पोटांतून एकदम ढुचमळून आलें.

उमेशला यायला खूपच उशीर झाला होता. पे-बिलांचा हा आठवडा म्हणजे नुसता धामधुमीचा. किती चिंबून जातो उमेश... पुन्हां पुन्हां तिला वाटलें, सहज आपण विचारायला गेलों अन्

(पान १७ वर चालू)








*दीपावलीच्या जुलैच्या अंकांत 'चीनचें आक्रमण व नेहरूंचें नेतृत्व' या विषयावर श्री. गाडगीळांनीं आपले विचार समर्थपणें प्रकट केले होते. त्याला पुष्टि देणारें—*



# हें मत वॉल्टर लिपमनचें आहे

लाल चीनचें आक्रमण आणि नेहरूंचें नेतृत्व या 'दीपावली'च्या जुलैच्या अंकांतील माझ्या लेखांत मीं नेहरूंच्या स्वतंत्र परराष्ट्र धोरणाचें स्वरूप सांगितलें असून त्याचें समर्थन केलें आहे. बड्या राष्ट्रांशीं लष्करी साहाय्याचे करारनामे करण्यानें मागासलेल्या राष्ट्रांना परचक्रापासून संरक्षण मिळविण्याऐवजीं त्यांच्यावर परचक्र येण्याचा अथवा तीं मागासलेलीं राष्ट्रें युद्धांत गोवलीं जाण्याचा धोका वाढतो, त्यांचें राजकीय स्वातंत्र्य नष्ट होण्याचा धोका वाढतो व आर्थिक विकास ही जी मागासलेल्या राष्ट्रांची पहिली गरज तिच्या मार्गांत अडथळे उत्पन्न होतात, इत्यादि मुद्दे नेहरूंच्या स्वतंत्र परराष्ट्र-धोरणाच्या समर्थनार्थ मीं मांडले होते. त्या धोरणाचें अमेरिकेच्या दृष्टिकोनांतून समर्थन सुप्रसिद्ध अमेरिकन लोकशाहीवादी लेखक वॉल्टर लिपमन यांनीं नुकतेंच 'न्यूयॉर्क हेरल्ड ट्रिब्यून' या दैनिकांतील एका लेखांत केलें आहे. त्यांचा युक्तिवाद महत्त्वाचा असून स्वतंत्र विचार करूं इच्छिणाऱ्या वाचकांना तो आवडेल. पुढील मजकूर लिपमन यांच्या लेखाचा अतिसंक्षिप्त गोषवारा आहे असें समजावें. लिपमन म्हणतात, "अमेरिकेचे राष्ट्रपति आयसेनॉर यांनीं आपल्या उरलेल्या अमदानींत अमेरिकेच्या परराष्ट्र धोरणा-संबधानें आतां पुनर्विचार केला पाहिजे. आजवरचें धोरण रशिया व लालचीन यांच्या आक्रमक प्रवृत्तीस पायबंद घालण्याकरितां त्या राष्ट्रांच्या सरहद्दीबाहेरच्या लगतच्या प्रदेशांत अमेरिकेनें लढाऊ तळ उभारणें हें होतें. पण टोकिओंत आयसेनॉरच्या आगमनाविरुद्ध जवळ जवळ जें बंड झालें आणि ओकिनावा बेटांत आयसेनॉर गेले असतां अमेरिकेच्या अमलां-तून जपानच्या अमलांत ओकिनावा बेट गेलें पाहिजे या मागणीविषयीं जें प्रचंड लोक-निदर्शन तेथें झालें त्यावरून अमेरिकेच्या या परराष्ट्रधोरणाचा पुनर्विचार करण्याची वेळ आली आहे. कम्युनिस्ट राष्ट्रांच्या भोंवतीं अमेरिकेचे लढाऊ तळ उभारून त्यांना वेढा देण्याचें धोरण दुसऱ्या महा-युद्धानंतरच्या नजीकच्या काळांत अमलांत आलें. त्यावेळीं अमेरिकेजवळच ॲटमबॉंब होता आणि रशियाजवळ नव्हता. म्हणून अमेरिका अजिंक्य होती. पण १९४९ सालीं रशियानें ॲटमबॉम्बचा शोध लावला आणि हे ॲटमबॉंब दूर अंतरा-वर नेऊन टाकण्याचीं विमानें व इतर शस्त्रास्त्रें तयार केलीं. पुढें रशियानें हायड्रो-जन बॉंबहि केला. त्यामुळें तेव्हांपासून अमेरिकेची ॲटमबॉंब व हायड्रोजनबॉंब बाबतची हक्कदारी व अजिंक्यता संपली म्हणून तेव्हांपासूनच अमेरिकेच्या परराष्ट्रधोरणाचा फेरविचार करणें जरूर झालें आहे. पण अमेरिकन सरकारनें तसें न करतां रशिया-

पां. वा. गाडगीळ






भोंवतालच्या राष्ट्रांना 'अमेरिका विरुद्ध रशिया' या तणातणींत तटस्थता सोडून अमेरिकेची बाजू घ्या आणि अमेरिकेला लढाऊ तळांना जागा द्या अशी मागणी केली. या मागणीला कांहीं राष्ट्रांनीं प्रमुखत्वें भारतानें विरोध केला. पण अनुकूल असणाऱ्यांची संख्या त्यावेळीं बरीच होती.

* * *

पण 'रशिया विरुद्ध अमेरिका' या तणातणींत अमेरिकेची बाजू घेऊन अमेरिकेला लढाऊ तळ देणाऱ्या राष्ट्रांतील सरकारांनीं जरी अमेरिकेची बाजू घेतली तरी त्या त्या देशांतील बुद्धिमानवर्ग आणि त्यांचे विचार ऐकत होती ती जनताही अमेरिकेच्या विरुद्ध जाऊन तटस्थतेची भूमिका घेऊं लागली. अमेरिकेचीं शस्त्रास्त्रें, धान्य व इतर नागरी आणि ग्रामीण उपयोगाचें साहित्य मोफत अथवा कमी किंमतींत त्या देशांत नित्य जात असता त्या राष्ट्रांतील जनता व बुद्धिजीवी वर्ग अमेरिकेचे न ऐकता तटस्थतेची भूमिका कां घेत आहेत हें अमेरिकन मुत्सद्यांना समजेचना. म्हणून ज्या राष्ट्रांतील लोक अशी तटस्थेची भूमिका घेतात तीं राष्ट्रें व ते लोक कम्युनिस्ट अथवा कम्युनिस्टपक्षपाती आहेत असा समज अमेरिकन मुत्सद्यांनीं स्वतःचा करून घेतला आणि तसा प्रचार चालू केला. पण वस्तुस्थिति अगदीं वेगळी होती. रशिया व चीन यांच्या भोवतालच्या ज्या राष्ट्रांतील सरकारांनी अमेरिकेला युद्धतळ दिले त्या राष्ट्रांचा बचाव रशियाजवळ ॲटम बॉंब व हैड्रोजन बॉंब यांचे साठे रचले गेल्यानंतर अमेरिकेकडून होणें शक्यच नव्हतें. एका हैड्रोजन बॉंबनें ओकिनावा बेट भूतलावरून नाहींसेंच होईल, अमेरिकेकडून बचावप्रयत्न होण्यापूर्वींच जपान वगैरे देशांचीहि रशियाच्या हैड्रोजनबॉंबनें हीच वाट लागेल अशी त्या त्या देशांतील लोकांची आतां खात्री झाली आहे. मग परराष्ट्रांत हें लढाऊ तळ उभारून त्या त्या राष्ट्रांचा परचक्राचा धोका कमी करण्याऐवजीं तो वाढविणें, आणि या परचक्राच्या भीतीनें त्या त्या राष्ट्रांतील जनता अमेरिकेच्या धोरणास विरोध करून तटस्थतेच्या भूमिकेचा पुरस्कार करीत असतां त्या राष्ट्रावर तीं कम्युनिस्ट

असल्याचा आरोप करणे यामुळें अमेरिका आपलें जगांतलें सामर्थ्य वाढवीत आहे का कमी करीत आहे? या परराष्ट्रधोरणाचा अमेरिकेनें फेरविचार करायला नको काय?

* * *

याचा अर्थ अमेरिकेनें कम्युनिस्ट राष्ट्रां पुढें माघार घ्यावी असा होत नाहीं. युरोपीय राष्ट्रें व आशियांतील राष्ट्रें असा फरक या बाबतींत केला पाहिजे. युरोपांतील राष्ट्रें राजकीय व आर्थिक दृष्ट्या पुढारलेलीं असून तीं बलवान आहेत. अमेरिकेशीं त्यांची जर एकजूट राहील तर कम्युनिस्ट राष्ट्रांच्या एकजुटीविरुद्ध ही पश्चिमी राष्ट्रांची एकजूट जगांतील परस्परविरोधी बड्या राष्ट्रांचा नाजवा समतोल ठेवील. हा समतोल कायम असेपर्यंत आशियांतील दुर्बल राष्ट्रांनीं या दोन्ही गटांपासून अलिप्त राहणें हाच त्यांच्या सुरक्षिततेचा मार्ग होय असें त्या राष्ट्रांतील जनतेला वाटतें व तें बरोबर आहे. या तटस्थता वृत्तीला अमेरिकेनें विरोध करूं नये, अथवा ह्या वृत्तीवर ती कम्युनिस्ट असल्याचा आरोप करूं नये; उलट या तटस्थता वृत्तीला पसंती दाखवून त्या राष्ट्रांशीं अमेरिकेनें मैत्री ठेवावी व त्यांना जरूर तें साहाय्य द्यावें. म्हणजे त्या राष्ट्रांत अमेरिकेबद्दल स्नेहभाव वाढून अमेरिकेचें वजनहि त्या राष्ट्रांत वाढेल. भारत, ब्रह्मदेश, इजिप्त इत्यादि राष्ट्रांच्या तटस्थतेला विरोध न करतां अथवा लष्करी साहाय्याचे करार करण्याबाबत त्यांच्यावर दडपण न आणतां अमेरिका जर त्यांच्याशीं मैत्री ठेवील तर अमेरिकेची मदत व अमेरिकेचें मार्गदर्शन हीं राष्ट्रें आपल्या अंतर्गत विकासाबाबत आनंदानें स्वीकारतील व त्यामुळें त्या त्या देशांत कम्युनिझमला अधिक चांगल्या प्रकारें विरोध होईल. अशा प्रकारें अमेरिकेच्या धोरणात बदल घडवून आणण्यास थोडासा काळ लागेल हें खरें. परंतु आयसेनहॉवर यांनीं आपल्या उरलेल्या अध्यक्षीय अमदानींत हें नवें वळण अमेरिकेच्या परराष्ट्रधोरणाला देऊन मगच निवृत्त व्हावें. पौर्वात्य राष्ट्रांना आपल्या नशीबीं 'हिरोशिमा' पुन्हां येऊं नये अशी तीव्र इच्छा असणें स्वाभाविक आहे. त्यामुळें अमेरिकेच्या लष्करी साहाय्याच्या कराराविरुद्ध तिकडे वातावरण भडकलें आहे. हें वातावरण शांत करून व त्या लोकांना निर्भय करून त्यांचा स्नेह मिळविण्याचा मार्ग त्या त्या देशांतील लढाऊ तळ काढून घेणें, त्या त्या देशांतील तटस्थतेच्या भावनेला मान देऊन त्या देशांना आर्थिक साहाय्य व पुनर्वटनेबाबत मार्गदर्शन करणें आणि या दोगें कम्युनिझमला विरोध करण्याची त्या त्या राष्ट्रांची इच्छा व शक्ति वाढविणें हें धोरण अमेरिकेनें यापुढें अवलंबिलें पाहिजे. असा धोरणपालट न केल्यास पौर्वात्य राष्ट्रांतील अमेरिकेच्या आजच्या उरलेल्या सामर्थ्याचा चक्काचूर झाल्याशिवाय राहणार नाहीं."

* * *

पंडित नेहरूंच्या स्वतंत्र परराष्ट्रधोरणाशीं लिपमनच्या वरील विचारांचें साम्य कितीसें आहे हें पाहणें मी वाचकांवर सोपवितों.

* * *

येथेंच, मला संशयास्पद वाटणारें पण बराच विचार करायला लावणारें, डेव्हिड मार्टिन या ऑस्ट्रेलियन लेखकाचें चीनबद्दलचें एक मत मी देतों. भारताच्या परराष्ट्र धोरणाशीं त्याचा निकट संबंध आहे. डेव्हिड मार्टिन लिहितात, "ऑस्ट्रेलियनांना वाटतें कीं लाल चीन हा यापुढें सतत आक्रमक धोरण अवलंबत आहे असें मानण्याला फारसा आधार नाहीं. इंडोनेशियाशीं लाल चीनचें जें भांडण आहे तें क्युमिनटँग पक्ष चीनमध्यें अधिकारावर असता तरी झालेंच असतें. जुन्या घाटाचें तें इभ्रतीचें भांडण असून दोन्ही बाजूनीं बराचसा मूर्खपणा त्यांत केला जात आहे. दिल्लीला जाऊन चाऊ एन् लाय यांनीं भारताला फारशा सवलती दिल्या नाहींत हें खरें. पण भारताला त्यांनीं तलवारीचा धाकहि दाखविला नाहीं अथवा वाटाघाटींचा दरवाजाहि बंद केला नाहीं. ब्रह्मदेश व नेपाळ यांच्याशीं लाल चीननें केलेल्या वाटाघाटी चातुर्याच्या व सलोख्याच्या होत्या. जपानशीं जें लालचीनचें धोरण आहे तें थोडेसें आचरटपणाचें आहे हें खरें; पण जपानांतील अमेरिकेच्या बाजूचा जो गट आहे त्याच्या विरुद्ध लाल चीनची तेढ आहे; एकंदर जपानी जनतेविरुद्ध नव्हे. दक्षिण कोरियाचा अध्यक्ष सिंगमन ऱ्ही याच्याविरुद्ध केवढें तरी बंड दक्षिण कोरियांत झालें व त्याला देश सोडून पळून जावें लागलें. पण कम्युनिस्ट उत्तर कोरियानें या काळांत दक्षिण कोरियामध्यें मुळींसुद्धां हस्तक्षेप न करतां अतिशय संयम दाखविला. यावरून लाल चीनचें धोरण आक्रमणाचें आहे असें म्हणतां येत नाहीं." मार्टिनच्या या मतावर आजच कांहीं न बोलतां पुढील काळांत घडणाऱ्या घटनांवरून त्याविषयीं मत बनावें हें बरें.

• •

( पान १४ वरून चालू )

उमेश किती चिडला. आणि आपल्याला असे डोहाळे लागले म्हणजे जास्तच कां तो चिरतो, चिडचिड करतो...अंजूच्या वेळीं देखील नाहीं कां......

...आणि व्हरांड्यांत सायकल ठेवून आंत शिरतांना, ऊर्मिलेची कपॅसिटी अजमावीत, उमेशच्या कपाळावरच्या आठ्या कुजबुजत होत्या..."त्या डंकेचा नवरा आपला बॉस म्हणून सिलेक्ट होऊन आलाय्...दोन तीन दिवसांपूर्वी इसलेली ती बातमी सांगावी कीं नाहीं हिला..."

• • •











अनुक्रमणिका

*लोकापवादाची भीति तिनें बाळगली नाहीं. कशाचीच पर्वा तिनें केली नाहीं; परंतु परिस्थितीनें जिच्यावर मात केली, अशी ही—*



# शी ला

श्यामकांताचे नाहीं तरी आताशीं घरांत बिलकूल लक्ष नसायचे. त्याला मोठ्या पगाराची केमिकल कंपनीत नोकरी मिळाल्यापासून आपली बायको सावित्री म्हणजे जुन्या जमान्यातील एक अडगळच वाटूं लागली होती. त्यांतून त्याची सात वर्षांची मुलगी नयना नापास झाल्याचे ऐकून तो बायकोवर खूपच भडकला.

"तुला जर चागलं वाचता येत असतं तर नयनाचा अभ्यास घुला घेतां नसता आला कां? पण आतां काय उपयोग?—" तो उद्गारला.

सावित्री बिचारी काय बोलणार. ती गप्पच बसली.

"शेजारचे बाळकृष्ण मास्तर नुकतेच वारले. त्यांची मुलं कशी उघड्यावर पडलीत्. त्यांची मोठी मुलगी शीला नोकरीच्या शोधांत आहे. आज सकाळीच आली होती आपल्याकडे. तुमच्या कचेरीत नोकरी मिळेल कां म्हणून विचारीत होती. मॅट्रिक होऊन दोन वर्षें झालीत तिची—" विषय बदलण्याच्या हेतूनें सावित्री म्हणांली.

"आजकाल बी. ए. झालेले पुरुष बेकार पडलेत. तर ह्या साध्या मॅट्रिक झालेल्या मुलीला नोकरी कशी मिळणार? पण असं करतां—तुर्त आपल्या नयनाला शिकवायला ठेव तिला. मग पाहूं काय करायचे तें"—असें म्हणत श्यामकान्तानें डोक्यावरून पांघरुण घेतले व थोड्याच वेळांत् तो घोरूं लागला.

आपल्या पतिराजाबरोबर सावित्रीला आणखी किती तरी गोष्टी बोलायच्या होत्या. श्यामकांतबद्दल लोक जें कांहीं बोलतात त्याची थोडी कुणकुण तिच्या कानीं आली होती.

श्यामकांत नेहमी गाण्याच्या बैठकींना जायचा व सिनेमा किंवा नाट्यगृहात तो नेहमी दिसायचा ह्या वेळीं कोणी तरी नायका असायच्या. त्याच्याबरोबर अशा गोष्टी तिच्या कानावर आल्या होत्या. त्यामुळे बाळकृष्णाच्या मुलीला आपल्या घरांत शिकवणीच्या कामासाटीं ठेवण्याची पतिराजांनीं जी सूचना केली तिच्यावर—सावित्री जेव्हां खोल विचार करूं लागली त्या वेळीं ती खूपच बेचैन झाली. आधीच श्यामकान्तच लक्ष घरांत कमी. त्यांत्न कानावर ऐकूं येत असलेल्या त्या कंड्या. पण त्याचा सोक्षमोक्ष करून घेण्याएवढी ती धीट नव्हती.

शीला परिस्थितीनं अगदी गरीब असली तरी रुपानें चांगलीच सुंदर होती. हुषार होती, तरुण होती. अन् थोडीशी लाघवी होती तिच्या लाघवी बोलण्याच्या भरीला पडून आपण आपल्या पतिराजां-जवळ तिच्या नोकरीचा विषय काढला कशाला असें सावित्रीला होऊन गेलें. बिछान्यावर पडल्या पडल्या छताकडे डोळे लावून ती स्वस्थ पडली. आपला बापानं गांवच्या इनामदाराच्या मुलाऐवजी शहरांतील श्यामकांतच्या गळ्यांत कां टाकले असा विचार तिच्या मनाला किंचित् चाटून गेला. दुसरे दिवशीं तिला उटायला खूपच उशीर झाला. सकाळीं आठ वाजतां शीला भरत चौकशी करायला आली. श्यामकांत दाढी करण्यांत मग्न होता.









गो. शं. पतके

" काय शीला, आमच्या नयनाला शिकवणार कां तूं ?–" श्यामकांतांनी दाढीवर ब्रश फिरवितां फिरवितां प्रश्न केला.

" मला आतांच सावित्री वहिनींनीं सांगितलं. आणि मी उद्यांपासून शिकवायला येईन, " शीला म्हणाली.

पहिले पंधरा दिवस विशेष कांहींच घडले नाहीं. सावित्रीची भीति व्यर्थ होती. शीला व नयना एका खोलींत बसून तासभर अभ्यास करायच्या. श्यामकांत त्यांची फारशी चौकशीहि करीत नसे. पंधरा दिवसांनीं मात्र श्यामकांतनें स्वतः शीलाला आपल्याबरोबर चहा घेण्याचा आग्रह केला. सावित्रीनें थोड्याशा धुश्यांतच तिला श्यामकांत-बरोबर चहा दिला. शीलाला देखील उगीच चोरट्यासारखं वाटलं.

"पुढील महिन्यांत आमच्या कचेरींतील एक कारकून रजेवर जाणार आहे. त्यावेळीं तुला नोकरीवर घेण्याचा विचार आहे. पण काम मात्र चोख केलं पाहिजे "—श्यामकांतनें तिला बजाविलें.

"मी अगदी मनापासून काम करीन. घरीं अभ्यास करून पुढें बी. ए. ला बसणार आहे. नोकरी मिळाली तर मला फी भरता येईल—"तिनें आपल्या अडचणींची कल्पना करून दिली.

नयनाला शिकविण्याशिवाय शीला आतां सावित्राला इतर कामांतहि मदत करूं लागली. त्यांची बाजारहाट पहाणें, श्यामकांत बाहेर-गांवीं फ़िरतीला गेल्यावर सावित्रीकडे सोबत म्हणून झोपायला येणे अशा रीतीनें सावित्रीवर शीलाचे उपकार होऊं लागले. आणि श्यामकांतच्या कचेरींत नोकरी लागल्यापासून तर शीला म्हणजे त्यांच्या कुटुंबाचीच एक घटक बनली. श्यामकांताबरोबर ऑफिसच्या गोष्टी बोलणें, थट्टा विनोद, खाणेंपिणें ह्या नित्याच्या गोष्टी झाल्या व सावित्रीला संवयीनें त्याचे कांहीं वाटेनासें झालें.

सावित्रीची आई आजारी असल्याची तार एके दिवशीं आली व आपल्या मुलीला घेऊन ती आईच्या गांवीं, उस्मानाबादच्या जवळील एका खेड्यांत निघून गेली.

बायकोला व मुलीला स्टेशनवर पोंचवून श्यामकांत घरीं आला तोच त्याला सकाळी ताप आला. दुसऱ्या दिवशीं तो कचेरींत गेला नाहीं. शीला कचेरी सुटतांच तडक त्यांच्या घरीं गेली.

" काल मला जर कळले असते तर मी ताबडतोब आले असतं आणि आतां घरांतहि कोणी नाहीं—मी माझ्या दादाला रात्रीं सोबतीला पाठवीन "—शीलानें सांगितलें.









अनुक्रमणिका

" आज काल प्रवासांत बिलकूल सुख नाहीं. कंपनीने आतां ठिकठिकाणीं नवीं केंद्रें खोलण्याचा सपाटा चालविला आहे. त्यामुळें मला मुळींच विश्रांति मिळत नाहीं. आणि माझा तो सेक्रेटरी एवढा मस्त गृहस्थ आहे कीं कांहीं विचारूं नकोस—मुंबईला मी कालच पत्र लिहिले आहे—तुला माझ्या सेक्रेटरीचे काम करावे लागेल."—श्यामकांत म्हणाले.

" अग बाई. हे जमणार कसें ? मी शार्टहँड टायपिंगच्या वर्गांत नुकतेच नांव घातले आहे. अजून चांगली स्पीड नाहीं--" शीला म्हणाली.

" संवयीनें येईल स्पीड. त्याचे कांहीं एक अवघड नाहीं—" श्यामकांत म्हणाला व गप्प बसला.

" थांबा. मी थोडी कॉफी करून आणते."— असें म्हणून शीला स्वयंपाक घरांत गेली. श्यामकांतनें तिला जी संधि दिली होती त्यामुळें श्यामकांताचे कसें आभार मानावे व त्यांचे उपकार कसें फेडावेत ते न समजल्यामुळें ती, पार गांगरून गेली होती. सेक्रेटरीची जागा मिळाली म्हणजे तिच्या पगारांत दीडपट वाढ होणार होती व फक्त महत्वाची कामेंच करावीं लागणार होतीं. श्यामकांतनीं आपल्यावर जे उपकाराचे एवढे ओझें करून ठेवलें आहे तें कसें फेडावें ह्या विचारांने ती अगदी ग्रासून गेली. तिचा बी. ए. च्या अभ्यासही समाधानकारक चालू होता व पुढील वर्षी परीक्षेला बसण्याची तिची तयारी चालू होती. कॉफी करून ती जेव्हां श्यामकांत जवळ गेली त्यावेळीं डोक्याला व्हिक्स चोळून श्यामकांत हुःश हुःश करीत पडला होता.

व्हिक्सची बाटली तिनें त्याच्या हातून काढून घेतली व आपल्या भावाच्या डोक्याला जेवढ्या सहज रीतीनें व्हिक्स चोळले असते अगदीं त्याच सहजतेनें तिनें श्यामकांतच्या डोक्याला स्पर्श केला आणि तिच्या अंगावर एकदम रोमांच उभे राहिले. तिचा चेहरा लालबुंद झाला. ती चांगलीच गोंधळली. श्यामकांत स्वस्त पडून होता. तिच्या हृदयांत उडलेल्या काहूराचे प्रतिबिंब तिच्या चेहऱ्यावर उमटलें. श्यामकांतच्या हाताचा तिला सहज धक्का लागला, " बस्स बस्स. एवढें कांहीं डोके दुखत नाहीं—" असं म्हणत त्यानें आपला हात सावरला. त्याच्या हाताच्या किंचितशा स्पर्शानें ती परत गोंधळली. परत लाजली. कसली तरी हुरहूर तिच्या हृदयाला चाटून गेली.

" शीला अशी बावरलीस काय ? सेक्रेटरीचे काम तुला आवडले नाहीं कांय ?—" त्यानें विचारलें.

" छे. छे. तसं कांहीं नाहीं - " असें म्हणून तिनें त्याच्यापुढें कॉफीचा कप आणून ठेवला.

श्यामकांतनें तो कॉफीचा कप हातांत घेतला. इतक्यांत टेबलावरील फोनची घंटी वाजली. शीलाने फोन घेतला. फोन ऐकून ती त्याला म्हणाली,

" तुम्हांला आज रात्रीं सरोजसाहेब सिनेमाला बोलावतात." त्याच्या हातांत तिने फोन दिला.

" आज रात्रीच येऊं म्हणतां ? तुम्ही असा एकाकी बेत-- आय सी आज होय ? बरं थांबा-मी येईन-" असें म्हणून त्यांनीं फोन खाली ठेवला व " सोलापूरांत जाऊन ठेपलें कीं पहिल्याने सिनेमाची तिकिटे काढली. आणि शीला, सरोज शेटची मुलगी डेसी गोड पोरगी आहे. मी मुंबईला गेलों कीं त्यांच्याकडे उतरतो. अशी झक्क व्यवस्था ठेवते बघ. त्यांनीं माझ्यासाठीं दोन तिकिटेंही काढलीत " तिच्याकडे स्वाभाविक मुद्रेनें पहात श्यामकांत म्हणाला.

" मग जा ना तुम्ही "-तिने थोडेसें मिस्किलपणें उद्गार काढले. श्यामकांतनें आपल्याला निमंत्रण दिल्याचें पाहून ती मनांतून खूपच आनंदली होती. पण त्याच्याकडून प्रत्यक्ष निमंत्रण सरळ सरळ यावे म्हणून ती जरा जरा मुद्दाम खट्याळपणानें पाहून हंसली.

"तुला यायला हवं. नाहींतर ह्या डेसीचा वेळ कंटाळवाणा जाईल. तूं लवकर घरीं जाऊन आईला सांगून माझ्याकडे ये. आईला सांग मुंबईचा साहेब आलाय. त्याच्या मुलीचा बंदोबस्त करणे आवश्यक आहे–" शीलाला, जे पाहिजे होते ते घडले. पण किती अचानक. त्यामुळें तिची छाती उगीचच धडधडूं लागली. तिचा व श्यामकांतच्या वाढत्या परिचयाचा विषय म्हणजे ऑफिससंबंधी लोकांना एक रहस्यच वाटत होते. सर्वांच्या प्रभावपूर्वक नजरा जेव्हां तिच्याकडे लागत व आजुबाजूचे लोक जरा कुत्सिक प्रश्न विचारीत त्यावेळीं ती प्रथम अगदी गोंधळून जायची. पण संवयीने ती धीट बनली. लोकांच्या त्या नजरांकडे, ती तुच्छतेने पाहूं लागली व आपल्या व श्यामकांतच्या मैत्रींतून लोक जो अर्थ काढीत होते त्याच्याकडे संपूर्ण दुर्लक्ष करावयाचा निर्धार तिने केला.

सरोजसाहेब व डेसी त्यांची व तिची सिनेमागृहांत ओळख झाली. एका नव्या जगांत प्रवेश केल्याचा उत्साह तिच्या अंगांत संचारला.

श्यामकांतच्या बरोबरीचे दुसरे बड़े अधिकारी तेथें इतर होते. त्या सर्वांची आणि तिची ओळख झाली. ह्या प्रसंगाला शोभून दिसेल अशी निळी जॉर्जेटची साडी व कानांत डूल घालून ती सर्वांचे आकर्षण बनली.

सिनेमा संपल्यावर श्यामकांतनें जेव्हां त्यांचा निरोप घेतला त्या वेळीं सरोज साहेब म्हणाले,





अनुक्रमणिका

"अरे तुमची ही सेक्रेटरी छोकरी बाई चालाख दिसते.–तिला बॉंबेला घेऊन ये एकदां."–

"पुढल्या खेपेला तिला जरूर मुंबईला घेऊन या–" डेझीने निमंत्रण दिलें. शीलाला बाहेरचे सारे जग ठेंगणें वाटले. तिचे ते ऑफिसमधील कारकुंडे व त्या नकट्या पोरी अगदी तुच्छवत वाटल्या. त्यांचे ते टाकाऊ जग निराळे व आपले हे नवें जग निराळे अशी तिनें आपल्या मनाची कल्पना करून घेतली. आपण ज्या निराळ्या जगांत वावरत आहोत तें कायम टिकणारे असून त्या ऑफिसमधील त्या कारकुनांच्या जगाला जीवनाच्या शर्यतीत आपण मागें टाकले आहे ह्या बद्दल तिची खात्री पटली नव्या बेहोष आनंदानें तर ती गुंग झाली. तसें म्हटले तर श्यामकांतच्या आणि माझ्या वयांत कांहीं फार अंतर नाहीं. त्यांची अजून चाळीशीं सुद्धां उलटली नाहीं. आणि मला नुकतेच चोविसावे वर्ष लागले. पण सावित्री!"—चालतां चालतां तिला रस्त्यांत किंचित् ठेच लागली. तंद्रींतून जागीं होऊन एकदाची ती घरीं पोचली.

दुसऱ्या दिवशीं सावित्री व त्यांचे वडील काशीनाथपंथ श्यामकांतच्या घरीं आले. शीला सहज चौकशीला आली त्या वेळीं श्यामकांतनें सांगितलें, "शीलाबाई मुंबईची तयारी करा. काल रात्रीं मुंबईहून फोन आलाय. खास मिटिंग करतां मला बोलावलंय. नोटस् घेऊन तुम्हाला यावं लागेल—"

शीला कांहीं म्हणाली नाहीं. सावित्रीला कांहींच उमज पडेना. दुसऱ्या दिवशीं आपले पतिराज आणि शीला एका गाडीनें मुंबईला गेल्याचे तिला समजलें. त्यावेळीं तिच्या जीवनांतील सारा आनंद मावळला. आईच्या मृत्यूचे दुःख झाले नसेल त्यापेक्षां केवढा तरी मोठा प्रहार त्या घटनेमुळें तिच्या अंतःकरणावर पडला. ज्या मुलीला आपण अन्नाला लावले त्या मुलीनें आपल्या संसाराला सुरुंग लावावा हे पाहून ती खूपच खिन्न झाली.

सोलापूरसारख्या लहानशा गांवांत श्यामकांत आणि शीला ह्यांच्या संबंधीं खूपच चर्चा होऊं लागली. श्यामकांतच्या कानांवरही त्याचे पडसाद पडूं लागले. तथापि जुना मॅनेजर सेवानिवृत्त झाल्यावर तोच "मॅनेजर" झाला होता. त्यामुळें कोणीं उघडपणे बोलत नसत. एक दिवशीं सायंकाळीं काम उरकल्यावर श्यामकांत शीलाला म्हणाला,

"शीला लोकांच्या तोंडाना कुलूप घालतां येत नाहीं. तुझ्या नी माझ्याबद्दल वाटेल ते लोक बोलतात. स्त्री आणि पुरुषांत साधी मैत्रि असल्याचे देखील समाजाला खरत नाहीं. लोकांच्या त्या चोरट्या नजरा आणि खवचट बोलणी ऐकवत नाहीं. आणि घर म्हणजे तर निवळ खाणावळ झाली आहे. सासरेबुवांचे सारी कुळं, नात्यागोत्यांतील मंडळी अगदी ठाण मांडून असतात—"

"पण आपण लोकांना कां म्हणुन भ्यायचं? तुम्हीं कांहीं कोणाचे वाईट केले नाहीं ना? तुम्हीं माझ्याशीं मैत्री करावी किंवा नाहीं यांशी त्या लोकांचा काय संबंध? खरं सांगूं–मला मुळींच त्यांची पर्वा वाटत नाहीं. सुरवातीला मला जरा भीति वाटली. पण मागाहून मला त्यांचे कांहीं वाटेनासे झाले आहे बघा.—" शीलाने धीटाईनें सांगितलें.

"पुढील आठवड्यांत आपण महाबळेश्वरला जाऊन येऊं. बोर्डाची मिटींग महाबळेश्वरला आहे."—श्यामकांतने सांगितलें.

ह्यावेळीं बोर्डाची मिटींग संपवून आल्यावर आणखी आठ दिवस श्यामकांत व शीला ह्यांनीं महाबळेश्वर येथेंच राहावयाचे ठरविले.

महाबळेश्वरच्या तलावांत जलविहार करीत असता एके दिवशीं सायंकाळीं श्यामकांत तिला म्हणाला—

"हा लपंडाव आपण किती दिवस खेळणार ? शीला, हें दुहेरी जीवन जगणें मला अशक्य झालंय. सावित्रीला पोटगी देऊन मी माझी मुक्तता करून घेणार. आमच्या जातींत अशी मुभा आहे. फार तर नयना आपल्याजवळ राहील—" श्यामकांतनें जणूं कांहीं सारा बेत आखूनच ठेवला होता.

श्यामकांतच्या छातीवर आपलं डोके टेकून आकाशांतील निळ्या रंगाची खोली मोजण्यांत शीला गर्क झाली. श्यामकांतवर तिचे निस्सीम प्रेम जडलें होते व त्या प्रेमाकरतां वाटेल तें करण्याची तिची तयारी होती. श्यामकांतशीं लग्न केल्यानें तिच्या प्रेमाची पूर्तता होणार होती. प्रीति साफल्याच्या गोड स्वप्नांत ती अगदीं रमून गेली. सावित्री व श्यामकांत ह्यांचे लग्न खेड्यांतच झालेले होतें. श्यामकांत आणि सावित्री विवाहाने जरी एकत्र आली होती तरी त्यांच्यांत भावनात्मक समानता कधीच निर्माण झाली नव्हती.

उलट शीलानें जेव्हां श्यामकांतच्या जीवनांत प्रवेश केला त्यावेळीं जीवन म्हणजे भावनेने जगण्याचे जग आहे, हें त्याला समजलें. शीलादेखील श्यामकांतकडे अशीच आकर्षिली गेली. प्रथम तो आपला उपकारकर्ता म्हणून ती मानायची. पण परिचयामुळें त्याच्याबद्दल तिच्या मनांत गोड संवेदना निर्माण व्हावयाच्या. रात्री बिछान्यावर पडली असतांना श्यामकांतबद्दलच्या विचाराने ती बेचैन होऊन जायची. श्यामकांत विवाहित आहेत व एका पतिव्रतेच्या संसाराचा हा प्रश्न आहे अशा घोर विचारांची छाया तिच्या सुखस्वप्नांचा भंग करायची. कधीं वाटायचें कीं नोकरी सोडून दूर कोठें तरी जावे. पण लगेच श्यामकांतची ती प्रेमळ मूर्ति तिच्या नजरेसमोर यावयाची. महाबळेश्वरच्या तलावांत श्यामकांतला आपण वचन दिले खरे पण हें सारें होणार कसे ह्या विचारानें ती गांगरून जायची.

तथापि खुद्द सावित्रीनेंच ह्या विषयावर तिच्याशीं बोलणें सुरू केले. सुटीच्या दिवशी कांहीं कामाकरितां ती श्यामकांतकडे गेली होती. श्यामकांत कांहीं कामाकरितां बाहेर गेला होता व सावित्रीचे वडिलही बाहेर गेले होते.



"शीला, तूं रागवणार नसलीच तर विषय काढते—" अशी सुरवात करीत सावित्रीनें तिला शेवटीं सांगितलें, "किती झालं तरी आम्ही खेड्यांतली माणसं. माझ्यापासून त्यांना सुख नाहीं व मलाही ते बरं लागत नाहीं. मला वाटतं तूं जर त्यांच्याशी लग्न केलंस तर ते नक्की सुखी होतील."

सावित्रीशीं काय बोलावें ते शीलाला समजेना. सावित्रीचे उदार मन पाहून ती खरोखरच गांगरली. तिला वाटलं होतं कीं एके दिवशीं ह्या विषयावर सावित्रीचे नि आपले भांडण होणार. पण सावित्रीनें किती कुशलतेनें तिला त्या अडचणींतून सोडविलें होतें. एवढ्या उदार मनाच्या स्त्रीचे मन आपण दुखवावे कां अशी शंका तिच्या हृदयाला चाटून गेली. पण दुसऱ्याच क्षणीं श्यामकांतच्या प्रेमाच्या जाणीवेने ती विव्हळ बनली.

सावित्री स्वतः होऊन निघून गेली. तिच्या वडिलांनीं काडीमोडीला सम्मति दिली. जातांना आपल्या मुलीलाही ते बरोबर घेऊन गेले आणि मग कांहीं दिवसांनीं श्यामकांतनें शीलाबरोबर आपला विवाह रजिस्टर केला.

तसें म्हटले तर शीलाचे जीवन बालपणापासून अतिशय हालांत गेले होते. तिचे वडील बाळकृष्ण मास्तर एका प्राथमिक शाळेंत मास्तर होते आणि आपल्या मुलाला आणि मुलीला त्यांनीं जेमतेम मॅट्रिकपर्यंत शिक्षण दिलें. दीर्घ आजारीपणांत भरलेला संसार तसाच टाकून बाळकृष्ण मास्तर जीवनांतून उठून गेले होते. श्यामकांतच्या कचेरींत शीलाला आणि तिच्या भावाला सरकारी नोकरी मिळताच तिची प्रापंचिक विवंचना दूर झाली.

श्यामकांतवरील प्रेमापुढें कोठल्याही लोकापवादाची किंवा स्वतःच्या आईच्या मताची पर्वा तिनें केली नाहीं. त्यामुळें भावनेचा जो कांहीं ओलावा तिला मिळणार होता तो श्यामकांताकडूनच. तोच तिचा एकमेव आधार होता. त्याच्या भरभक्कम खांद्यावर आपली मान ठेवून साऱ्या जगापासून ती दूर झाली होती. ते लोक नकोत. त्यांचे ते हेवेदावे, कुत्सित, मर्मावर घाव घालणारे, मन तोडणारे संस्कार नको असे तिला होऊन गेले होते. श्यामकांतशीं तिचे लग्न होतांच बाजूचे जग थोडे पारखे झाले एका विवाहित पुरुषाचे कुमारिकेवर बसलेल्या प्रेमाकडे शुद्ध मनाने पहाण्याची समाजाची तयारी नव्हती. त्यामुळें शीलाशी लग्न होतांच श्यामकांतानें आपली अहमदनगरला बदली करून घेतली. श्यामकांतच्या संग्रहांत त्याची पुष्कळशीं छायाचित्रें होती. कित्येक छायाचित्रांत डेसीही होती. एका फोटोंत तर श्यामनें तिला गाढ आलिंगन दिल्याचे दृश्य होतें. ते फोटो पाहून तिचे मन विचलित झाले. लग्नाच्या पार्टीच्या-वेळीं डेसीचे श्यामकांतबरोबरचे वर्तन देखील तिला पसंत पडले नाहीं. दोनच दिवसांनी तिनें त्याबाबत श्यामकांतला छेडलें.

"श्याम. आपल्या लग्नाच्या पार्टीच्या वेळीं ती डेसी फारच लाडांत आली होती. आणि तूं देखील अगदी ताळतंत्र सोडून नाचत होतास, खिदळत होतास आणि अगदीं मजा करीत होतास."

"तिला मी आलिंगन देल्याचे आणि तिचे चुंबन घेतल्याचे पाहिले नाहींस काय तूं ? तुम्ही बायका किती मत्सरी नि वेड्या असतात. ह्याबाबतींत ती सावित्री आणि तूं–मुळीच फरक दिसत

नाहीं मला. कुठं एखाद दिवशीं गाण्याच्या मेफलीला गेलों कीं कशी फुरगंटून बसायची सावित्री. आणि तूं एवढी मॉडर्न असून देखील माझ्यावर विश्वास ठेवायला तयार नाहींस. " श्यामकांतनें तिलाच उलट दोष दिला.

" माझा तुझ्यावर पुरा विश्वास आहे रे. पण तिचे वर्तन जरा वाह्यातंच होतं. लोक म्हणतील त्याची मुळीं फिकिरच नव्हती तिला. स्वतःच्या नाहीं तर तुमच्या लौकिकाची तरी तिने जरा पर्वा करायला हवी होती—"

" पुन्हां आपलं तेंच. लोकांची पर्वा कशाला ? कसंही वागलं तरी लोक नांवं ठेवणारच. आपण लग्न केलं नव्हतं त्यावेळीं लोकं आपल्याकडे बोटं दाखवायचीं. आणि लग्न केलं तरी आपणाला नांव ठेवतातच. जाऊं दे-डेसीची तूं काळजी करूं नकोस. कोणाशी कधीच लग्न करणें तिला मानविणार नाहीं. अगदीं लहानपणापासून मी तिला ओळखतो. मला ती अगदीं वडील भावाप्रमाणे मानते. म्हणून जरा लाडिवाळपणानें आणि सलगीने वागते. तुला तशी भीतीच वाटत असेल तर एक फक्कडसा नवरा शोधून काढ तिच्यासाटीं. मी तिचं मन वळवीन.—" असे म्हणून श्यामकांतनें शीलावरच डाव उलटविला.

श्यामकांतच्या वर्तनाचा आपण उगाच संशय घेतला अशी स्वतःची तात्पुरती समजूत करून घेऊन ती तो प्रसंग विसरली. त्यांतूनच तिला मातृत्वाची जाणीव झाल्याचा आनंदही होत होता. श्यामकांतला जेव्हां ती गोष्ट समजली त्यावेळीं शीलाचे त्यानें एवढे कौतुक केले आणि तिची तो जी अक्षरशः फुलासारखी काळजी घेऊं लागला. त्यामुळें तिचे दिवस अत्यंत आनंदानं पार पडले. प्रत्यक्ष सुखाचा उच्च बिंदु गांठला.

श्यामकांतनें आपल्या मुलीचे नांव ठेवले " माधुरी ". माधुरीच्या जन्मामुळे त्याच्या जीवनांत नवीनच माधुरी पैदा झाली. तीन महिने हां हां म्हणता निघून गेले. सर्व दिवस कसे आनंदांत पार पडले. तिचा भाऊ तिच्यावर लग्नाच्या वेळीं रागावला होता. तो देखील राग विसरला व आईला घेऊन नगरला आला. त्यामुळें शीलाच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं. आपल्या छोट्या माधुरींत ती एवढी रममाण झाली कीं आपल्या मुलीपुढें तिला सारे जग तुच्छ वाटूं लागले. माधुरीसाठीं कपडे शिवणें, तिच्या दुधाची व्यवस्था करणें, तिला नवी नवी खेळणीं आणणें तिची फुलासारखी सुश्रूषा करणें ह्यांत तिचे दिवस भराभर पार पडूं लागले. ती जसजशी माधुरींत गुरफटून गेली तसतशी तिची व श्यामकांतची ताटातूट होऊं लागली. सकाळीं चहाच्या वेळीं शीला माधुरीला आंघोळ घालण्यांत, नाहीं तर तिला खेळविण्यांत मग्न असायची. बिचाऱ्या श्यामकांतला एकटेंच चहापान करायला लागायचे व तो पुढें ऑफिसची वाट धरायचा. अशा तऱ्हेनें दिवसामागून दिवस गेले व शीला आणि श्यामकांत ह्यांच्यातील अंतर वाढतच चालले. एके दिवशीं श्यामकांत घाईघाईनें घरीं आला नि मुंबईला लगेच निघून गेला. मुंबईहून त्याची तार आली व त्याचा मुक्काम आठ दिवस तेथेंच लांबला. तथापि माधुरीच्या सहवासामुळें शीलाला श्यामकांतची

**कलाकृतींच्या जन्मकथा : ४**



# हा हन्त ! हन्त ! नलिनीम्....!

युरोपमधल्या वास्तववादी चित्रकृतीच्या ऐन भरभराटीचा तो काळ होता. एखाद्या चित्रांतला प्रसंग हुबेहूब वास्तवतेला धरून चित्रित व्हावा यासाठीं चित्रकार किती कष्ट घेत याच्या त्या काळांतल्या कथा आज खरोखरीच अद्भुत वाटल्याशिवाय रहाणार नाहींत. आज कॅमेऱ्याची सोय झाल्यामुळें हुबेहूब चित्रीकरण ही गोष्ट फारशी अवघड राहिली नाहीं. पण ज्या काळांत कॅमेरा उत्तम कामगिरी बजावूं शकत नव्हता तेव्हां वास्तववादी कलेला फारच मान होता. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं होऊन गेलेला मिलाईस नांवाचा कलावंत असाच अतिशय कष्टाळू होता. आपल्या चित्रांतील वास्तवता राखण्यासाठीं तो कमालीची काळजी घेत असे 'ऑफेलिया' या चित्रासाठीं त्यानें असेच कष्ट घेतले. एवढेंच नव्हे तर वास्तवतेच्या वेडापायी या चित्रामुळें एक शोकपूर्ण घटना घडली.

हॅम्लेट या नाटकांतील 'ऑफेलिया' हे एक स्त्रीपात्र आहे. ही निष्पाप लावण्यवती हॅम्लेटवर प्रेम करीत असते. आपल्या वडिलांच्या खूनाचा सूड घेण्याच्या विचारांत हॅम्लेट इतका गर्क झालेला असतो कीं ऑफेलीयाच्या प्रेमाची कदर करायला त्याला मुळीच वेळ नसतो. प्रेमभंगाचें दुःख ऑफेलीयाच्या वांट्याला येते आणि त्याच्या धक्क्यानें वेड लागून अखेरीस ती आत्महत्या करते.

मिलाईसनें पाण्यावर तरंगणारे ऑफेलियाचे मृत शरीर चित्रित करण्याचें ठरवलें. हा प्रसंग करुण तसाच काव्यमय होता. मरण असले तरी ते कमलिनीचें होतें. सौन्दर्यलतिकेचें होतें—अर्थात या देखाव्यांत भेसूरतेपेक्षां कारुण्य उत्पन्न होणें अगत्याचें होतें. त्यांतलें काव्य टिकायला हवें होतें. ज्या ठिकाणीं ऑफेलियानें आत्महत्या केली ते ठिकाणही विषयांत ह्या काव्यमयतेला पोषक असणें आवश्यक होतें. ऑफेलीयाच्या आत्महत्येचें ठिकाण निसर्ग सौन्दर्यानें नटलेलें







अनुक्रमणिका

हवें. वरच्या बाजूनें वृक्षवेली झुकल्या आहेत. सुंदर पांढऱ्या फुलांचे घोस वेलींना लगडले आहेत. वाऱ्याच्या झुळकीमुळें त्या फुलांतली टपोरी फुलें पाण्यावर अलगद फेंकली जाऊन तरंगत आहेत. पाण्यांत विविध तऱ्हेच्या वनस्पती उगवल्या आहेत. आणि पाण्यांतल्या खडकाशी लागून ऑफेलीयाचें प्रेत तरंगते आहे. तिच्या हातांत फुलाची फांदी आहे. आणि अलगद झोंपी जावें तसें प्रणयाचें स्वप्न पहात तो निष्पाप जीव निसर्गाच्या त्या रमणीय कुशींत विसावला आहे. आणि मृत्यूसुद्धां स्वतःचें भयानक स्वरूप इथें विसरला आहे. आणि एखाद्या नाजूक अभ्रकाला हृदयाशी घ्यावें तसें ऑफेलीयाला मृत्यूनें कवटाळलें आहे.

मिलाईसच्या मानवसृष्टींत देखावा तयार झाला. आता प्रत्यक्ष सृष्टीच्या अभ्यासाची गरज होती. निसर्गाचें रमणीय स्वरूप निरीक्षण करण्यासाठीं मिलाईस घराबाहेर पडला. सबंद उन्हाळा आणि हिंवाळा त्यानें थेम्स नदीच्या कांठाकांठानें हिंडण्यांत घालवला. त्यानें अनेक स्केचेस केलीं. चित्रें चितारली. एखाद्या दिग्दर्शकानें कॅमेऱ्यानें अनेक फोटो काढून घ्यावेत तसे मिलाईसनें कैक तरी छोटी चित्रें तयार केली. पाण्यावर फुलें कशी तरंगतात ? पाण्यांत उगवणाऱ्या वनस्पती कशा दिसतात ? खोल पाण्याच्या रंगछटा कशा असतात ? या बाबतीत मिलाईसनें सूक्ष्म अभ्यास केला. त्याच्या चित्राची रमणीय पार्श्वभूमी तयार झाली.

आता या पार्श्वभूमीला शोभेल अशा ऑफेलियाची गरज होती. सुंदर, नाजूक, निर्मल हृदयाची, भावनाशील तरुणी त्याला हवी होती. मिस सिदाल या कामाला योग्य अशी मुलगी होती. मिस सिदालला त्यानें या बाबतीत विचारणा केली. एका थोर चित्रकाराच्या कलाकृतींत आपल्याला स्थान मिळणार या विचारानें सिदालला खूप आनंद झाला.

मिलाईस म्हणाला, " या चित्रांतील काम अवघड आहे. तुला पाण्याच्या टबमध्यें झोंपून राहावें लागेल त्यासाठी स्टुडिओंत मी खास टब तयार करणार आहे त्या टबमधील पाणी गरम रहावें म्हणून त्यांत आंतील बाजूनें दिव्याची व्यवस्था करणार आहे मात्र मी सांगेन त्या अवस्थेंत तुला पडून रहावे लागेल. " मिस सिदलनें याही गोष्टीला होकार दिला " कितीही अवघड कामगिरी असली तरी मी पार पाडीन " असें तिनें आश्वासन दिलें.

आणि खरोखरीच सिदालनें अपेक्षेबाहेर मिलाईसला सहकार्य दिलें. आपल्या चेहऱ्यावर ती अशी कांहीं भावपूर्ण छटा उमटवी कीं प्रत्यक्षांत ऑफेलियाच आपल्यापुढें आहे असें मिलाईसला वाटे. कैक दिवस काम चालें होतें. मिलाईसच्या चित्रांत ऑफेलिया साकार होऊं लागली. जसजसें चित्र पूर्ण होऊं लागलें तसतसा मिलाईस कलानंदाच्या विलक्षण धुंदींत गर्क होई. आणि या बेहोषीतूनच त्याच्या हातून एक फार मोठी चूक घडली ! चित्रकाम पुरे होण्याच्या शेवटच्या दिवशीं तो टबमधील दिवे लावायला विसरला !

बाहेर कडाक्याची थंडी पडली होती. मिलाईस चित्रकामांत दंग होता. पाण्यांत विसावलेली सिदाल थंडीनें आंतल्या आंत कुडकुडू लागली होती. मिलाईसचें चित्रकाम संपलें आणि सिदालला शाबासकी देण्याच्या उद्देशानें तो ओरडला, " सिदाल धन्य आहे तुझी ! तुझें काम संपलें. तुझी ही प्रतिमा आता अमर होईल अशी मला खात्री वाटते. बघ ! हे तुझें चित्र बघ ! "

पण सिदालकडून उत्तर आलें नाहीं. घाबऱ्यामनानें जेव्हां मिलाईस तिच्याजवळ गेला तेव्हां सिदाल गारठून निपचित झाली होती. त्यानें तिला शेगडीजवळ नेऊन उब दिली. कांहीं वेळानें सिदाल शुद्धीवर आली पण त्या दिवसापासून तिची प्रकृति ढासळली. त्या नाजुक ललनेच्या शरीरांत भिनलेला गारठा तिला प्राणघातक ठरला. आणि मिलाईसच्या चित्रांतील ती ऑफेलिया अखेरीस खरोखरीच मृत्यूच्या स्वाधीन झाली !

**— भय्यासाहेब ओंकार**

●●●

---

गैरहजेरी मुळी देखील जाणवली नाहीं. आठ दिवसांनीं श्यामकांत परत आला व त्यांचा संसाराचा गाडा नेहमीप्रमाणें चालूं लागला.

एके दिवशी दुपारीं तिची श्यामकांतच्या टेबलावरील पुस्तकांकडे नजर गेली. पुस्तके व इतर कागद अस्ताव्यस्त पडले होते. तिनें सर्व पुस्तके नीट लावली व कागद पण व्यवस्थित गुंडाळून ड्रावरमध्ये ठेवले. श्यामकांतनें मुंबईहून कांहीं नवीं पुस्तके आणली होती. त्यापैकी एक पुस्तक तिनें सहज चाळायला हातांत घेतलें व त्यातून निळ्या कागदाची एक चिठ्ठी खाली पडली. तिनें सहज कुतुहलानें ती चिठ्ठी उघडून पाहिली व तिच्या डोळ्यापुढें अंधेरी आली.

डेसीनें श्यामकांतला लिहिलेलें तें एक पत्र होते. त्यावर तारीखं देखील अगदी अलिकडची होती. त्या पत्रांत लिहिलेल्या मजकुरावरून तिला वाचले कीं श्यामकांत व डेसी ह्यांनीं मुंबईला जुहू येथे सरोज साहेबाच्या बंगाल्यांत अगदी चैनींत दिवस काढले होते. डेसीला श्यामकांतची राहून राहून आठवण होत होती व श्यामकांतला तिनें पुन्हा मुंबईला पाचारण केलें होतें.

तिनें डेसीचे पत्र फाडून जाळून टाकले व श्यामकांतच्या पत्रव्यवहारावर नजर ठेवण्याचें ठरवून टाकले. चार दिवसानें असेंच एक पत्र आले तें तिनें परस्पर वाचून फाडून टाकलें. श्यामकांतला तिनें झालेल्या प्रकाराची मुळींच जाणीव होऊं दिली नाहीं.

एके दिवशीं रात्रीं जेवतांना श्यामकांत म्हणाला, " मला परत आठ दिवसाकरतां मुंबईला जावे लागेल उद्यां. आज ऑफिसमध्यें सरोजचा फोन आला होता. दिल्लीला आमच्या कारखान्याची मोठीशी शोरुम खोलायची आहे. त्याकरतां दिल्लीला जावे लागेल. तुला सुद्धां चांगली संधि होती. पण वेत्री लहान असल्यामुळें तुला येता येईल किं नाहीं त्याची शंकाच आहे. पण त्यांतूनही धाडस करायचे असेल तर पहा —"

शीला कांहीं बोललीच नाहीं.

" कां ?- विचार कसला एवढा ? " श्यामने परत विचारलें.

" मला नाहीं येतां येणार. आणि मला वाटते तुम्हीही जाऊं नये. तुम्ही गेलात कीं मला मुळीं देखील करमत नाहीं "—ती लाडिकपणें म्हणाली,





" अग पण मला न जाऊन कसं चालेल ? कंपनीचा खास भार माझ्यावर आहे–मला गेलंच पाहिजे "—तो परत उद्गारला.

" तुमच्या कंपनीची शोरुम दिल्लीला उघडणार आहे कीं जुहूला ? " शीलानें रागाने विचारले.

" ह्याचा अर्थ ?—हं. हं. हं.–डेसीबद्दल तूं बोलतेस—" श्यामकांत थोडा चांचरला—

" हो. मला तुमच्याकडून खुलासा हवाय–डेसीचं व तुमचं प्रकरण कोठवर आलंय ? " तिनें आवाज चढविला.

" पण डेसीचा तुला एवढा मत्सर कां वाटतो ? ती वात्रट असली तरी किती गोड पोरगी आहे. स्त्री–पुरुषांतील शुद्ध मैत्री देखील तुम्हाला पाहवत नाहीं—छे छे. तूं परत अगदी अडाणी बाईप्रमाणें वागूं लागलीस बघ " श्यामकांतनें तिची समजूत घालण्याचा यत्न केला.

" पण मला हे बिलकुल पसंत नाहीं. " ती निश्चयानें म्हणाली.

" पण तसं म्हटलं तर तिची नि माझी मैत्री तुझ्या-माझ्या लग्नापूर्वीपासूनची आहे. आणि नसता संशय घेण्याचे कांहीं एक कारण नाहीं. गांवढळ बाईसारखी भलतंच वेड डोक्यांत घालून उगीच कुढत बसूं नको. " त्यानें तिचे सांत्वन करण्याचा यत्न केला.

ज्या सुखाकरतां तिनें सावित्रीला संसारांतून उठविली त्याच सुखांतून डेसी तिला उठवूं पहात होती अशी तिनें आपली समजूत करून घेतली.

एके दिवशीं श्यामकांत मुंबईला जायला निघाला त्यावेळीं शीला अगदीं हट्टच धरून बसली.

" शाम, ह्यावेळीं तरी तुम्हीं जाऊं नका. बेबीला दोन दिवस झाले ताप आहे. सारी रात्र मी जागून काढली. कसंही करून तुम्हीं दोन दिवस आणखी थांबा—"

" मी थांबलो असतो ग. पण मी गेलों नाहीं तर आपलं खूप नुकसान होईल. ह्या वेळचं कमिशन मिळालें कीं, पुण्याला आपण एक प्लॉट घेऊं—" त्यानें तिची समजूत घालण्याचा यत्न केला.

" मला प्लॉट वगैरे कांहीं नको. तुम्हीं हवेत, शाम—" तिनें आर्जवी स्वरानें त्याची विनवणी केली.

" अगदीं वेडी आहेस बघ. अजून माझ्याबद्दल विश्वास नाहीं ? —" त्यानें पृच्छा केली.

शामकांतनें तिच्या समजुतीखातर मुंबईला जाण्याचा आपला बेत तात्पुरता रद्द केला. तिला खूपच समाधान झाले. आठ दिवसांनीं शामकांत जेव्हां परत मुंबईला गेला तेव्हां त्याच्याबद्दल तिच्या मनांत मुळीं देखील किल्मिष राहिलं नाहीं.

पण तिचा आनंद फार दिवस टिकला नाहीं. एके दिवशीं खुद्द डेसीच त्यांच्याकडे पाहुणी म्हणून आली.

" किती दिवस झाले तुझी बेबी पहायला यायचे म्हणून. पण शाम म्हणजे कसा डॅम फूल आहे बघ—शेवटीं आतां त्यानें मला बोलाविलें—" डेसीनें प्रस्तावना केली.

" मी सुद्धां त्याला म्हटलें होते. बरं झाली तूं आलीस, आतां आपण खूप गंमत करूं—" आनंदाचं भरतं आल्याचं नाटक तिनें केलें.





अनुक्रमणिका

डेसीकरतां शामकांतनीं गांवाबाहेरील एका खाजगी बंगल्यांत राहण्याची व्यवस्था केली होती. डेसी तिकडेच राहायला गेली. रात्रीं शाम किती उशीरापर्यंत घरीं आला नाहीं. डेसी तेथें चार दिवस होती त्यापैकीं एकही रात्र शाम घरीं वेळेवर परतला नाहीं. चार दिवसांनी डेसी परत मुंबईला निघून गेली. पण शामकांता-बरोबर चैन करण्याकरतांच ती आली असली पाहिजे अशी स्वतःची समजूत करून घेऊन शीला दुःखी झाली.

श्यामकांत तिच्या दृष्टीने आतां चांगलाच निर्ढावला होता. आपल्या भावनांनी तो बिलकूल देखील कदर करीत नाहीं असें तिला वाटूं लागले. माधुरीला घेऊन घराबाहेर पडावें असे विचार तिच्या डोक्यांत घुमूं लागले. बाहेरच्या जगांतील ते भीषण जीवन कसे जगायचे ? पतिव्रता म्हणून राहायचे—तिला कांहींच उमज पडेना. अशा प्रश्नांनी तिला भंडावून सोडलें. तिचा धीर खचूं लागला. श्यामला सुधारण्याची बिलकूल शक्यता नव्हती. श्याम पुरा बिघडला होता अशी तिची समजूत झाली.

एके दिवशीं स्वयंपाकी कामावर आला नसल्याने श्यामला चहा करण्याकरतां तिनें स्टोव्ह पेटविला. तेवढ्यांत टपाल आले. श्यामकांत स्नानगृहांत होता. तिनें टपालावरून नजर फिरविली. डेसीच्या अक्षराचा लिफाफा तिला दिसला. तो तिनें आपल्या हातांत घेतला व ती स्वयंपाकघराकडे गेली. लिफाफा फोडून तिनें आंतील पत्र वाचण्यास घेतले. श्यामकांत तिच्यामागे केव्हां येऊन उभा राहिला हे तिला समजले देखील नाहीं.

" दुसऱ्याची पत्रें चोरून वाचण्याची संवय वाईट. मी माझी सारीं पत्रं नेहमीं टेबलावर टाकतो; डेसीची देखील. एवढं चोरून वाचण्यासारखे काय आहे त्यांत—" त्यानें थोड्याशा रागाने विचारले.

" एवढं त्यांत कांहीं नाहीं ना ? मग झालं तर—हे पहा—" असें म्हणून तिनें स्टोव्हवर पत्र धरले. श्यामकांतनें ते जळतें पत्र तिच्या हातांतून हिसकावून घेण्याचा यत्न केला. तेवढ्यांत तिच्या पातळावर जळते पत्र पडले व तिच्या अंगाभोंवतालच्या कपड्यानें पेट घेतला. हां हां म्हणतां ती भाजून पोळून निघाली.

श्यामकांतनें तिच्यावर झडप घालून तिच्या कपड्यावरील आग विझविण्याचा यत्न केला. त्याच्या शर्टनेही पेट घेतला. त्याचा आरडाओरडा ऐकून शेजारी धांवून आले. दोघांनाही हॅास्पिटलमध्यें पोचते करण्यांत आले.

श्यामची जखम लवकर भरून आली. पण शीलाच्या शरीराचा मात्र अगदीं लोळा गोळा झाला. ज्या सौन्दर्याचा तिला एवढा अभिमान होता त्याचा तिच्या चेहऱ्यावर मागमूसही राहिला नव्हता. तिचा चेहरा आगीच्या भक्षस्थानीं पडल्यानें अगदीं भेसूर होऊन गेला होता.

तिला जेव्हां घरीं परत आणले तेव्हां श्यामनें तिची स्वतः शुश्रूषा केली. श्यामनें ऑफिसमधून रजा घेऊन सबंध महिना तिच्याजवळ काढला. तरी तिच्या प्रकृतींत सुधारणा झाली नाहीं.

" माधुरीला डोळ्यासमोरून दूर नेले कीं शीला कावरीबावरी व्हायची. तिच्या जखमा शिवल्या होत्या तरी तिला ताप येत होता व तापाचे प्रमाण वाढतच होते. वास्तविक जखमा इतक्या व्यवस्थित भरून आल्या होत्या कीं त्यामुळें ताप येण्याचे मुळींच कारण नव्हते. तिची तब्येत पहायला डॅाक्टर आले. असतांना श्यामकांतला एकदां ते म्हणाले, " त्यांच्या जखमा तशा भरून निघाल्या आहेत पहा. पण त्यांनीं एकंदर प्रकार खूपच मनाला लावून घेतलाय, त्यांतून हार्ट अतिशय अशक्त आहे. त्यांच्या मनाला जरा शांति लाभली तर त्यांचा ताप तात्बडतोब बरा होईल. त्यांच्या भोवतालचे वातावरण जर प्रसन्न करतां आलं तर पहा—" डॅाक्टरने सल्ला दिला.

पण वातावरण बदलण्यांत श्यामकांतला यश आले नाहीं. रात्ररात्र तो तिच्याजवळ जागून काढी. एका मध्यरात्रीं श्यामचा बसलेल्या खुर्चीत डोळा लागला, त्यावेळीं शीलाच्या हुंदक्यानें त्याला जाग आली. लगेच श्याम तिच्या जवळ गेला.

"वेडी कुठली ! तुला लवकर बरं व्हायचं ना ? मग अस रडायचं कशाला ? बघ पुण्याला आपण कसा छान बंगला बांधायचा. तिथं आपण जायचं. मग माधुरी मोठी होईल. शाळेंत जाईल किती मजा येईल.

" पण असलं भेसूर तोंड घेऊन जगांत मुळींच हिंडायच नाहीं. श्याम तुम्हीं कशालं एवढ्या खस्ता खातां. डेझीबद्दल मी उगाच संशय घेतला. मला तुम्ही क्षमा करा. तुमचे हृदय मी समजलें नाहीं. मी कोणावर रागावले नाहीं. बेबीला अंतर देऊं नका एवढी माझी शेवटची इच्छा–" ती बडबडत होती.

तिचा ताप बराच चढला होता. तिच्या जवळ माधुरीला आणलं. निजलेली पोर जागी झाली नि रडूं लागली. आईच्या मृदू हाताच्या स्पर्शाने ती गप्प राहिली.

" श्यामकांत, तुम्हाला देवाचं भजन नाहीं म्हणता येत ? सावित्री वहिनी किती गोड भजन म्हणायच्या ? त्यांचा आवाज किती गोड—किती छान रात्र पडली आहे. माझ्या कानांत पहा दुरून कुठून तरी भजनाचे सूर येतात. असं वाटतं कीं देवाचं नांव सारखं ऐकत राहावं आणि स्वस्थ पडावं. श्याम, देवाचं नांव किती पवित्र आहे नाहीं. हें भजन कानीं पडलं कीं सारा राग, सारा लोभ, सारा स्वार्थ, सारा अंधार दूर पळून जातो. मन किती शांत, स्वस्थ होत. मनाच्या किती बरं वाटतं. श्याम ईश्वर नामाच्या, गजराचे तें भजन तसेंच चालूं दे. मला ते ऐकूं दे. मला आतां कांहीं नको. आतां माझ्या माधुरीची तूंच आई–मी जाते–" असें म्हणून शीलानें आपलें डोळे मिटले ते कायमचेच.

श्यामकांतच्या डोळ्यातून अश्रू वाहूं लागले. त्याने वेड्यासारखे इकडे तिकडे पाहिले व शीलाच्या शरीराला घट्ट मिठी मारली—

" काळे, ती हृदयाने फार गोड होती. पण मानी होती.– कुरुप चेहऱ्यानें जगांत रहायचेच नाहीं असा निर्धार होता तिचा–तिनें आपला हट्ट निश्चय पुरा केला. जीवनाशीं टक्कर देऊन तिनें आपलें प्राण गमाविले. व आम्हाला पोरके केले–" श्यामकांत उद्गारले. श्री. काळे ह्यांनी शीलाची एक मोठी एनलार्जमेंट श्यामकांतच्या घरीं आणून लावली.

त्या तसबीरकडे श्यामकांत टक लावून पहात त्या वेळीं त्यांच्या डोळ्यांतून अश्रु बाहेर पडत.

*आपल्या दृष्टीच्या जाळ्यांत त्यांनीं सारा भूप्रदेश, संस्कृति, शास्त्रें जीवमात्रांच्या स्वभावांच्या अनंत छटा इत्यादि गोष्टी कशा पकडल्या असतील ? याचा विचार आला कीं मन विस्मित होतें.*

# वाल्मीकीचे डोळे

ब्रह्मदेवानें वाल्मीकिंमुनींना श्रीरामाचें चरित्र लिहिण्याची स्फूर्ति देतांच एकाग्र चित्तानें वाल्मीकिमुनी दर्भासनावर बसले आणि योगधर्मामुळें श्रीरामचरित्राचें ज्ञान त्यांना होऊं लागलें. तपःसामर्थ्यानें प्राप्त झालेल्या त्यांच्या ज्ञानदृष्टीस तें सारें रामायण रंग-रूपासह साकार होऊन जसेंच्या तसें दिसूं लागलें. हिमाचलापासून कन्याकुमारीपर्यंतचा प्रदेश, त्याखालीं गगनचुंबी पर्वतशिखरें, त्यावरून खळाळणाऱ्या नद्या, त्या प्रदेशावर वास्तव्य करून राहिलेले मानव, पशु-पक्षी आणि यापुढें पसरलेला अथांग समुद्र व त्यांतलें तें लंका बेट हा सारा भूखंड त्यांच्या दृष्टीच्या प्रकाशमान झोतांत त्यांना सुस्पष्ट दिसूं लागला. ही ती प्रभु रामचंद्राची अयोध्या नगरी, ही पवित्र शरयू नदी, रामानें वनवासांत ज्याच्यावर वास्तव केलें तो हा चित्रकूट पर्वत, ही पंचवटी, तें सीताहरण, हाच तो ऋष्यमूक पर्वत, हेंच तें पंपासरोवर—अशी सारीं स्थानें त्यांच्या दृष्टीसमोरून सरकूं लागलीं. त्यांच्या दर्शनानें वाल्मीकिमुनींच्या अंतःकरणांत विविध रसांनीं भरती येऊं लागली. त्यांची प्रतिभा स्फुरण पावूं लागतांच सारें ब्रह्माण्ड तिनें पोटाशीं धरलें एवढी ती व्यापक झाली. वाल्मीकिमुनींच्या अंतःकरणांतून उचंबळून आलेलें, अनंत सौंदर्यरागांनीं लखलखत असलेलें, मानवी संस्कृतीच्या परम वैभवानें उजळून निघालेलें व मानवी जीवनांतलें चिरंजीव रोमहर्षक नाट्य दर्शविणारें हें रामायण वाचूं लागलें कीं मन आश्चर्यानें थक्क होतें. श्रेष्ठ कलेचा व संस्कृतीचा आदर्श घडविणाऱ्या या महात्म्याच्या मनांतून व दृष्टींतून कोणत्या अद्‌भुत शक्तीनें विलास केला असेल असा प्रश्न निर्माण होतो. मानवी मनाच्या सूक्ष्म कलांपासून तो जडाच्या सूक्ष्म रुप-रेखेपर्यंत या नजरेनें, या शक्तीनें सारें विश्व टिपून घेतलें. मानवी रूपाचें, स्वभावाचें, सामर्थ्याचें वर्णन करतांना साऱ्या विश्वाचें ज्ञान मानवाला घडवणाऱ्या, व मानवाचें सारें व्यक्तिमत्त्व प्रकट करणाऱ्या त्याच्या डोळ्यांवर तर या महाकवीचा विलक्षण लोभच जडलेला दिसतो. रामाचे डोळे, सीतेचे डोळे, रावणाचे डोळे, मारुतीचे डोळे, राक्षसिणीचे डोळे, सुंदर स्त्रीचे डोळे! कमलनयन रामानें मृगनयना सीतेकडे पहिल्या भेटींत कसें पाहिलें असेल? वात्सल्यानें भरलेल्या दशरथाच्या डोळ्यांना राम वनवासप्रसंगीं अश्रूंच्या धारा लागून कशी अंधारी आली असेल? कामवासनेनें व क्रोधानें उजळलेल्या रावणाच्या डोळ्यांना सीता कशी दिसली असेल, राम कसा दिसला असेल. कुंभकर्णाचे डोळे व क्रोधामुळें त्याच्या डोळ्यांत आलेले अश्रु कसे असतील? रावणवधानंतर सीता-रामाची परत दृष्टि भेट कशी झाली असेल? विश्वाचें ज्ञान घडविणाऱ्या या विविध डोळ्यांच्या विविध छटा पाहतांना मन हरखून जातें. हें सारें सौंदर्य अवलोकन करणाऱ्या वाल्मीकीचे डोळे कसे असावेत असा प्रश्न मनापुढें उभा राहतो. हे वाल्मीकीचे डोळे इतरांच्या डोळ्यांतून त्यांना दिसणारें जीवन पाहतात व त्या डोळ्यांतून बाहेर पडून त्या त्या घटना प्रसंगांकडे, त्या त्या व्यक्तिरेखेकडे पाहतात. तिच्या डोळ्यांकडे पाहतात...

**शंकर वि. वैद्य**

रामाचे डोळे कमळाच्या पाकळ्यांच्या आकाराचे व विशाल आहेत. ते परस्पराशीं समान व परस्परांपासून योग्य अंतरावर आहेत. नखें आणि हातपायांचे तळवे या प्रमाणेंच त्याचे नेत्रप्रांत ताम्रवर्ण, आरक्त आहेत. भिवया एकसारख्या आहेत. त्यांची दिसावला उत्कृष्ट आहेत. समुद्राचें गांभीर्य, हिमालयाचें धैर्य, विष्णूचें वीरत्व, चन्द्राचें आल्हादत्व, पृथ्वीसारखी क्षमावृत्ति व क्रोध





अनुक्रमणिका

आला असतां प्रलयाग्नीप्रमाणें भयंकर वृत्ति अशा अनेक गुणांनीं त्याचें व्यक्तिमत्व समृद्ध आहे. तो सत्यवचनी आहे. पितृभक्त आहे. अशा रामाला राज्याभिषेक होंणार असें पाहून मंथरेनें कलुषित केलेली कैकेयी मत्सरग्रस्त झाली.

कैकेयी सुंदर आहे. ती सुंदर-नयना आहे. तिचे डोळे काळे आहेत—दशरथ तिला भेटायला आला तेव्हां अतिक्रोधामुळें भिवया मुखाकडे करून ती जमिनीवर निजली. रामाला वनवासाला पाठवण्याचा तिचा हट्ट ऐकतांच दशरथ शोकावेगानें मूर्च्छित पडला. शुद्धीवर आल्यावर त्याच्या डोळ्यांतून घळघळा अश्रु येऊं लागले. रडून रडून त्याचे अश्रूंहि आरक्तवर्ण झाले. नेत्र व्याकुळ झाल्यामुळें त्यांची दृष्टिहि अंधुक झाली. पुढें पुत्रशोकानें प्राण कंठांत घुटमळतांना, तो कौसल्येस म्हणतो, "कौसल्ये डोळ्यांनीं मला दिसत नाहीं यास्तव तूं मला स्पर्श कर. कारण यमसदनाला निघालेल्या माणसांना कांहीं दिसेनासें होतें." रामाच्या वनवासाचें वृत्त ऐकल्यावर कौसल्या कुऱ्हाडीनें तोडलेल्या साल वृक्षाच्या फांदीसारखी जमिनीवर पडली. तिचे नेत्रप्रांत कृष्णवर्णाचे आहेत. त्यावरून अश्रु वाहूं लागले. राम परत केव्हां आणि कसा येणार या दुःखद जाणिवेनें ती म्हणाली, "माझे ठिकाणीं तुझ्या आगमन चिंतेमुळें हा अग्नि उत्पन्न झाला आहे, तूं आतां दृष्टीस पडणार नाहीस अशी जी माझी मनःप्रवृत्ति, तिचेंच ह्याला वायूप्रमाणें साहाय्य मिळालें आहे. विलाप आणि दुःख ह्यांच्या योगानें हा पेटत आहे. रडतां रडतां पडलेले अश्रू ह्याच आहुति यांत टाकलेल्या आहेत. चिंता आणि अश्रू हाच यांचा प्रचंड धूर आहे...हा शोकाग्नि मला वणव्याप्रमाणे जाळून टाकील!" रामाच्या वनवासाची वार्ता ऐकतांच लक्ष्मण नागासारखा मुग्ध झाला. त्यानें डोळे वटारले, त्याच्या भिवया चढल्या. महासर्पाप्रमाणें सुस्कारे टाकीत तो दशरथ व कैकयीची निर्भत्सना करूं लागला. रामाने त्याचें सान्त्वन केल्यावर त्याच्या डोळ्यांतून आलेले अश्रू रामानें पुसले. राम सीतेला वनवासांत न्यायला तयार होईना तेव्हां हरणाच्या बछड्याच्या डोळ्यांसारख्या डोळ्यांतून गळणाऱ्या ऊष्ण अश्रूंनीं सीता पृथ्वीला जणूं स्नानच घालूं लागली. रामाच्या भाषणानें विद्ध झालेल्या व संतापलेल्या सीतेच्या डोळ्यांतून स्फटिकासारखें स्वच्छ जल कमलांतून गळणाऱ्या उदकासारखें दिसूं लागलें. "हे आरक्तनयने मी तुला वनांत येण्याची आज्ञा देतो" असें रामानें म्हणतांच ती आनंदित झाली. पौरजनांत हाहाकार झाला. "मत्स्यांच्या हालचालीनें चलित झालेल्या कमलापासून जसें पाणी गळूं लागतें तसे नगरांतील स्त्रियांच्या नेत्रांतून दुःखाश्रू गळूं लागले." परंतु क्षमेमध्यें पृथ्वीची बरोबरी करणाऱ्या रामानें सारें दुःख अविचल मनानें सहन केलें. त्याच्या डोळ्यांत अश्रू आले नाहींत कीं त्याचे डोळे क्रोधानें फुलले नाहींत. रामाचा रथ वनवास मार्गावर दृष्टीआड झाला तरी त्या रथानें उडालेल्या धुरळ्याकडे दशरथ व्याकुळ नजरेनें पाहत राहिला.

दुःखानें, मोहानें, क्रोधानें व्याप्त झालेले अनेकांचे डोळे एका बाजूला आणि सत्यवचनी, धीरगंभीर, धर्मशील रामाचे निग्रही डोळे दुसऱ्या बाजूला असा विलक्षण तोल बालकांडांत आढळतो. अरण्यकांडांत सीतेचें अपहरण होतें तेव्हां व किष्किंधाकांडांत निसर्गाचे विविध विलास पाहून विरह वाहून सीतेची आठवण होतांना या कमलनयन रामाच्या डोळ्यांतून पाहत वाल्मीकिमुनींनीं जें भावदर्शन व सौंदर्यदर्शन घडविलें आहे तें असाधारण आहे. या अरण्यकांडांतच शूर्पणखा भेटते व साऱ्या कथाप्रसंगाला विलक्षण कलाटणी मिळते. या शूर्पणखेचे डोळे अलातचक्रासारखे आहेत. मृगलोचना सीतेला कांचनमृगाचा मोह पडतो. लक्ष्मणानें रामाच्या मदतीस जावें म्हणून सीता डोळे लाल करून त्याच्यावर क्रुद्ध होते. तेवढ्यांत रावण येतो. सीतेचे सुंदर डोळे त्याच्याहि नजरेंत भरतात. "तुझे विशाल आणि स्वच्छ असे काळ्या बाहुल्यांनीं युक्त नेत्र आहेत व त्यांचे प्रांत आरक्तवर्ण आहेत" असें तोहि म्हणतो. सीता क्रुद्ध होऊन डोळे लाल करून त्याला कठोर बोलते तेव्हां रावणानें आपलें भयानक स्वरूप प्रकट केलें. "त्याचे नेत्र अग्नीप्रमाणें आरक्तवर्ण होऊन नेत्रप्रांत हिरवे होऊन गेले." व शेवटीं तिचे केस डाव्या हातानें धरून व उजव्या हातानें उचलून रावण तिला घेऊन गेला. रामानें आल्यावर भिरभिरत्या डोळ्यांनीं तिला शोधली. "सीता पाहिली कां?" असें तो झाडाझुडपांना, पशुपक्ष्यांना विचारीत वेड्यासारखा धावूं लागला. त्यानें मृगाला विचारलें, "हे मृगा, हरणाच्या बछड्याप्रमाणें जिचे डोळे आहेत ती सीता तुला तरी ठाऊक आहे काय? कारण हरिणाक्षी



अनुक्रमणिका





स्त्री हरिणीबरोबरच असली पाहिजे." "हे सीते, हरिणबालकांचे नेत्र तुझ्या वियोगामुळें अश्रूंनीं कलुषित झाले आहेत." जटायूनें रामाला सीताहरणाचें वृत्त सांगितलें. जटायूचे नेत्र ताम्रवर्ण होते. पुढें किष्किंधाकांडांत रामाच्या विरहाची तीव्रता निसर्गसौंदर्य पाहून वाढते. त्याच्या कामभावना जागृत होतात. तो लक्ष्मणास म्हणतो, "जिच्या नेत्राच्या पापण्या सूक्ष्म आहेत, जिचे केस उत्कृष्ट आहेत व जिचे भाषण मृदु आहे अशी सीता दृष्टीस पडत नसल्यामुळें आतां मला जिवंत राहण्याचें कांहीं प्रयोजन दिसत नाहीं." "नील कमलासारख्या नेत्रांनीं युक्त असलेली सीता माझ्यावाचून कशी जिवंत राहील?" "लक्ष्मणा कमलकोषाचीं दलें सीतेच्या पापण्यासारखी आहेत म्हणून पाहावोसी वाटतात." रामाच्या या डोळ्यांना प्रफुल्लित पलाशवृक्षांच्या योगानें पर्वत शिखरें पेटल्यासारखीं दिसतात. भूमीवरील पुष्पराशीनें थर शयन करण्याकरता अंथरलेल्या विछान्याची आठवण करून देतात. रामाच्या मनाला स्फुरणाऱ्या या कल्पना सुंदर तर आहेतच पण रामाच्या मनःस्थितीची जाणीव करून देणाऱ्या आहेत. पुढें वर्षा ऋतूचें व शारदी सौंदर्याचें वर्णन करतांना याचाच प्रत्यय येतो. "आकाशरुप स्त्री जलगर्भ टाकून देत आहे, ताम्रवर्ण श्वेतवर्ण व जलामुळें आर्द्र दिसत असलेल्या अभ्ररुप फडक्यांनीं आकाश जखम बांधलेल्या पुरुषाप्रमाणें दिसत आहे, वायु हाच ज्याचा निःश्वास, संध्यारुप केशरानें चोपडलेलें, श्वेतवर्ण मेघ हे फिक्कट गाल असें आकाश कामातुर पुरुषाप्रमाणें दिसत आहे. शोकसंतप्त सीता ज्या प्रमाणें अश्रु गाळीत असेल त्या प्रमाणें भूमि वाफ बाहेर सोडीत आहे, निळ्या मेघांत स्फुरण करणारी वीज रावणाच्या अंकावर तडफड करणाऱ्या सीतेप्रमाणें दिसत आहे, नदीरुप कामातुर स्त्रिया चक्रवाकरुप स्तन उन्नत करून तटरुप वृद्ध स्त्रियांना दूर लोटून समुद्र भर्त्याकडे धाव घेत आहेत, रतियुद्धांत तुटलेल्या हारांतील मोत्यांप्रमाणें जल धारा पडत आहेत, मोत्यांच्या हारांसारखे धबधबे गुहांतील उन्नत प्रदेश धारण करीत आहेत, माझी मात्र भिजून गेलेल्या नदीच्या तीराप्रमाणें दैन्य झाली आहे." रामाच्या डोळ्यांना निसर्गांतून शृंगाराच्या खुणा दिसतात तशाच भावीयुद्धाच्या कल्पनाहि दिसतात. गंभीर गर्जनेनें युक्त असलेल्या मेघांच्या मुद्रा युद्धाला उत्सुक असलेल्या वानरासारख्या दिसतात. शरद्‌ऋतुवर्णनांतहि निर्मल आकाश, स्वच्छ चांदणे, शांत नद्या पाहून रामाच्या डोळ्यांना सारा निसर्ग स्वतःला हवा तसा दिसतो. "मेघ मदरहित गजांप्रमाणें वेगरहित झाले आहेत, उत्साहशून्य मयूरपक्षी प्रियांविषयीं आसक्ति सोडून ध्याननिष्ठ झाले आहेत, प्रिय पतींनीं उपभोग घेतल्यामुळें आळसत आळसत चालणाऱ्या कामिनी स्त्रियांचे वेग ज्याप्रमाणें प्रभातकाळीं मंद झालेले असतात त्याप्रमाणें नदीरूप स्त्रियांचे वेग मंद झालेले आहेत. या उलट मदमत्त बैल गायींच्यामध्यें आनंदानें डुरकण्या फोडीत आहेत, हत्तीण मदमत्त होऊन कामप्रेरणेनें भर्त्याच्या पाठोपाठ चालली आहे. सुशोभित चंद्रकिरणांचा समुदाय ह्या प्रिय पतीच्या हातचा स्पर्श झाल्यामुळें हर्षित होऊन आपली नक्षत्ररूप नेत्रतारका प्रकट करीत अनुरागारक्त संध्यारूपी कामुक स्त्री आपोआपच आकाशरूप वस्त्राचा त्याग करीत आहे." रामाच्या डोळ्यांना, मनाला सर्वत्र शृंगाराचा भास होतो. रामाच्या डोळ्यांतून पाहणाऱ्या वाल्मीकीच्या भव्य प्रतिभेचा विलास येथें प्रत्ययास येतो.

किष्किंधा व सुंदरकांडांत व नंतर आलेल्या वानरांच्या डोळ्यांचे त्यांच्या भावच्छटांचे वर्णनसुद्धां लक्षणीय आहे. सुग्रीव पिंगटसोनेरी वर्णाचा आहे. सुग्रीव व रामाचें सख्य झालें असतां सीता, वाली व राक्षस यांचे अनुक्रमें कमलासारखे, सुवर्णासारखे व अग्नीसारखे असलेले डावे डोळे एकदम स्फुरण पावूं लागले. लवूं लागले. रामाच्या सख्यामुळें सुग्रीवाचे आरक्तवर्ण नेत्र हर्षानें विकसित झाले.—वालीचे मुख उज्वल व नेत्र पीतवर्ण आहेत. तो क्रुद्ध झाला असतां त्याचे नेत्र प्रदिप्त अग्नीसारखे दिसतात. रामाचा बाण मर्मी बसल्यावर वाली डोळे फिरवूं लागला. ताम्र व गैरिक या धातूंनीं युक्त अशा पर्वतावरून पाण्याचे प्रवाह वाहतात तसे त्याच्या अंगांतून रक्ताचे पाट वाहू लागले. वालीपुत्र अंगद याचे डोळे पिंगटवर्णाचे आहेत. तारेचे डोळे सुंदर व धुंद आहेत. वानराचे डोळे मधासारखे पिंगट आहेत. हे वानर सीतेचा शोध करीत दक्षिणेला जातात तेव्हां विंध्यचलाजवळ त्यांना संपाति हा गृध्र पक्षी भेटतो. या संपातीला वाल्मीकीनें विलक्षण वेधक दूरदृष्टि प्राप्त करून दिली आहे. तो वानरांना सांगतो कीं आम्हांला चक्षुष्मती विद्येनें प्राप्त



अनुक्रमणिका





होणारें दिव्य दृष्टि–सामर्थ्य आहे, आणि त्यामुळें आहाराच्या सामर्थ्यानें व जातिधर्मानें आम्हांला नेहमीं शंभर योजनापेक्षाहि लांबची वस्तु दृष्टीस पडत असते. मला येथून रावण व जनककन्या सीता दिसत आहे. संपाति व जटायु यांनीं सूर्यासमीप उडत जाण्याचा यत्न केला असतां त्या व्योमस्पर्शी उंचीवरून पृथ्वी व सूर्य कसा दिसेल याचें जें वर्णन वाल्मीकीनें केलें आहे तें चकित करून टाकणारें आहे. संपाति म्हणतो, "सूर्य अस्ताचलाला जाण्यापूर्वीं त्याला गांठायचे असें ठरवून आम्ही उड्डाण केलें तेव्हां त्या उंचीवरून भूतलावरील नगरें रथांचा चाकाप्रमाणें दिसूं लागलीं. गवतानें भरलेलें वन दिसतें तसें, देशांनीं भरलेलें भूतल दिसूं लागलें. पर्वतांनीं आच्छादित भूमि लहान लहान धोंड्यांनीं आच्छादित अशी दिसूं लागली, नद्यांनीं व्याप्त असलेली पृथ्वी सुतांनीं व्यापल्यासारखी दिसली. हिमालय, विंध्य, मेरू हे पर्वत जलाशयांतल्या हत्ती एवढे दिसू लागले, दिशा ओळखूं येईनात, अंग दग्ध होऊं लागलें दृष्टीची गति कुंठली, सूर्य पृथ्वीएवढा मोठा दिसूं लागला-तेथून मी खालीं पडलों." एका अफाट उंचीवर नेऊन वाल्मीकीनें वाचकाला अंतराळात वर वर नेत एका विलक्षण अनुभवाची प्रतीति आणून दिली आहे, व डोळ्यांना भूतल कसें दिसेल हें दर्शवले आहे. या उलट, मनासारखी गति असलेलें व बालसूर्यासारखी प्रभा असलेलें पुष्पक विमान नेतांना भूतलावरून पाहिलें असतां आकाशगामी चन्द्रासारखे छोटें व आल्हाददायक दिसतें. परंतु सुंदरकांडांतला मारूतीच्या उड्डाणाचा व समुद्रोल्लंघनांचा प्रसंग म्हणजे अद्‌भुताला विश्वसनीयतेचें व कलात्मक वास्तवाचें स्वरूप प्राप्तकरून देणाऱ्या महाकवीच्या प्रतिभेचा मनोहर विलास आहे. मारुतीच्या डोळ्यांनी झालेलें वैभवसंपन्न, रत्नखचित लंकेचे दर्शन, सीताशोधनांत त्यानें दाखविलेली मार्मिकता, राक्षस, राक्षसीचे भयानक दर्शन, रावणाचें उज्वल व्यक्तिमत्त्व पाहून मारुतीच्या मुखांतून निघालेले धन्योद्गार, भयानक डोळे असलेल्या राक्षसींच्या पहाऱ्यांत बंदिस्त असलेली मृगनयना, खिन्ननयना सीता हा सर्वच कथाभाग अत्यंत मनोरम आहे. तो पहाण्यापूर्वी उड्डाणाचा आविष्कार पाहाण्याजोगा आहे.

प्राणि, पक्षासारखा आकाशांत झेप घेऊं शकत नाहीं, पृथ्वीचे आकर्षण त्याला ओढीत असते व अनेक योजने समुद्र उडत लंघून जाणें विश्वसनीय ठरणारें नाहीं याची वाल्मीकमुनींना जाणीव आहे. या कच्च्या दुव्यापासूनच त्यांनीं प्रारंभ केला आहे. दक्षिण सागर पाहतांच सारे वानर खिन्न झाले. भयभीत झाले. समुद्र उल्लंघून जाता येणार नाहीं याची त्यांना खात्री पटली. अंगदानें धीर देऊन प्रत्येकाला त्याचें सामर्थ्य विचारलें तेव्हां एकजण म्हणाला मी दहा योजने उडी मारीन, गवाक्ष वानर म्हणाला मी वीस योजने मारीन...असें करीत करीत शेवटीं अंगद म्हणाला शंभर योजने समुद्र लंघून मी जाईन पण तेवढीच माझी शक्ति असल्यानें मी पुन्हां परत येऊं शकणार नाहीं. शेवटीं जांबवानानें हनुमंताला त्याच्या शक्तीची कल्पना दिली. जांबवान मारुतीची स्तुति करूं लागला. "गरुडाचें सामर्थ्य तुझ्या ठिकाणीं आहे. तूं वायुपुत्र आहेस" असें तो म्हणाला. सूर्य ग्रहण करण्यासाठीं जन्मतःच त्यानें अंतरिक्षांत कशी झेप घेतली याचें वृत्त त्याला सांगितलें "हें पराक्रमी, महावेगवान हनुमानी, विष्णूनें ज्या प्रमाणें तीन पावलें टाकलीं त्या प्रमाणें तूं गतीचा अवलंब कर!" असें आवाहन हनुमंताला करतांच हनुमानाचें शरीर वृद्धिंगत होऊं लागलें. वानर हर्षानीं गर्जना करूं लागले. हनुमान जास्त जास्त वाढू लागला. हर्षानें शेपूट आपटूं लागला. त्याचें मुख पेटलेल्या भट्टीप्रमाणें शोभूं लागलें. तो म्हणाला 'उदयाचलापासून निघालेला सूर्य अस्ताचलावर जाण्यापूर्वीं मी त्याला स्पर्श करून येऊं शकतो' गरुडापेक्षां हजारपट गमन करण्यास मी समर्थ आहे.' वाल्मीकीनें हा अद्‌भुत प्रकार कौशल्यानें हळूहळू विश्वसनीय करीत नेला आहे. प्रचंड उड्डाणास लागणारी ताकद, उड्डाणानें जमिनीस बसणारा हादरा, प्रवेगाने वायूचें होणारें कंपन, व हनुमंताची खालीं पडणारी सावली, उत्तुंग उंचीवरून दिसणारी पृथ्वी या साऱ्याची कल्पना वाल्मीकीच्या कलादृष्टीस आहे. उड्डाणाचा हादरा सहन व्हावा म्हणून मारुति महेंद्र पर्वतावर चढला. जेवढ्या प्रमाणांत मारुति मोठा झाला त्या भव्यतेची कल्पना देणाऱ्या प्रतिभा वाल्मीकीनें योजल्या आहेत.

पर्वतावर चढल्यावर अग्नितुल्य मारुतीनें अंग हालवून रोम हालविले, मेघाप्रमाणें गर्जना केली.-गरुड सर्पाला वरचेवर उचलून खालीं टाकतो त्याप्रमाणें आपले शेपूट उचलून तो आपटूं लागला, अडसरासारखे हात पर्वतावर ठेवले. कटिप्रदेशाच्या ठिकाणीं कृश बनून पाय संकुचित केले. खांद्याजवळ हात संकुचित करून कंठाजवळ मान संकुचित केली. प्राणवायूचा निरोध केला व पर्वतास ताडण करून त्यानें उड्डाण केलें तेव्हां पर्वत हादरले. त्याच्या अंगावर वृक्षांचीं फुलें पडल्यामुळें पावसाळ्यांत रात्रीं काजव्यांनीं चमकणाऱ्या पर्वतासाराखा तो दिसला. पर्वतावर वणवे लागावेत तसे हनुमानाचे विजेसारखे प्रज्वलित नेत्र वणव्यासारखे दिसले. त्याचे पिंगट वर्णाचे प्रचंड डोळे प्रभा मंडळानें युक्त असल्यानें आकाशांतल्या चंद्रसूर्यासारखे दिसूं लागले, पर्वतावर मेरूची विशाल शिला दिसावी तसा त्याचा कमरेखालचा पार्श्वभाग दिसूं लागला. सागरांत पडलेलें त्याचें प्रतिबिंब भव्य नौकेप्रमाणें धांवत होतें. त्याच्या वेगानें आकाशांत उडालेलें जल शरद् ऋतूंतील मेघाप्रमाणें दिसलें. समुद्रांतली त्याची सावली मेघांतून क्षणाक्षणाला बाहेर पडत मेघांत शिरणाऱ्या चंद्राप्रमाणें तो दिसला.–त्याच्या झंझावाती वेगानें सारा समुद्र उलथापालथा होऊं लागला–अशा रीतीनें हनुमान त्रिकुट पर्वतावर उतरला व त्यानें त्यावर वसलेली दिव्य लंका पाहिली.

रावणाच्या लंकेंत भयानक रूपाचे राक्षस होते. कांहीं एकाक्ष होते. राक्षसांच्या कांहीं स्त्रियां सुंदर होत्या. त्या रूपानें जशा कांहीं जळत होत्या. कांहीं स्त्रिया सुवर्णरेषेप्रमाणें तेजस्वी व सडपातळ होत्या. चंद्रासारख्या तेजस्वी मुखपंक्ति, उत्कृष्ट पापण्यांनीं युक्त मनोहर नेत्रांच्या वक्र पंक्ति अशा स्त्रिया अवलोकन केल्या. रावणाच्या अंतःपुरांत सूक्ष्मरुप धारण करून हनुमान गेला. वाटेंत दिसलेल्या पुष्पक विमानाजवळ पापणीहि न हलवणारे विशाल व तारवटलेले डोळे असलेले राक्षस त्यानें पाहिले. अंतःपुरांत अनेक सुंदर स्त्रियां

होत्या. दिवाणखाना प्रकाशानें जसा पेटला होता. कांहीं स्त्रियांचे नेम अर्धवट मिटून त्यांवर ग्लानि दिसत होती कांहींचे नेत्र पूर्ण मिटले होते मुखकमलांची वांछा करणारे ते नेत्रभ्रमर त्यानें पाहिलें. घुंगुराप्रमाणें ज्याचे डोळे मिटले आहेत अशा कांहीं स्त्रिया निद्रिस्त होत्या दिवाणखान्यांत जळत असलेले सुवर्णदीप हे डोळ्यांचे पातें न लववितां सुंदर स्त्रियांकडे पाहणाऱ्या पुरुषांप्रमाणें भासले. जवळच राजेशाही मंचकावर रावण मद्यपान करून व कामतृप्त होऊन पडला होता त्याचे नेत्र आरक्तवर्ण होते त्याचें पांढरें रेशमी वस्त्र अस्ताव्यस्त झालें होतें. एक कमललोचना स्त्री वीणा कवटाळून झोपली होती एक नृत्य करणारी सुंदरी हावभाव करतां करतां तशोच आविर्भावांत झोपली होती पण हनुमंताला विशालनयना सीता तेथें दिसली नाहीं तेव्हां खिन्न होऊन तो शोधीत शोधीत अशोक वनांत गेला. तेथल्या राक्षसी भयंकर मुद्रांच्या होत्या. कोणाला एकच डोळा होता. कोणाचे डोळे पिंगट वर्णाचे होते. कांहींचे मुख व नेत्र फारच मोठे होते. हरिजटानामक राक्षसीचे डोळे मांजरासारखे – घारे–होते. त्या ठिकाणीं सीमा दिसतांच हनुमंतानें ओळखली ती विशालनयना होती. हरिणाच्या छाव्याप्रमाणें मनोहर डोळ्यांनीं युक्त असलेली सीता इकडे तिकडे पैहात होती. अश्रुजलानें परिपूर्ण, कृष्णवर्ण व कुटिल पापण्यांनीं युक्त व अप्रसन्न अशी तिची लोचनें होती. ती सुस्कारे टाकीत होती. तिला पाहून हनुमानाच्या डोळ्यांत पाणी आलें. ओझ्यापुढें नांव उदकांत बुडते तशी ती दुःखभारानें सीता शोक सागरांत बुडत होती. आकाशांतून निखळून पडलेल्या तारकेसारखी ती होती पाणीदार डोळ्यांची सीता भयचकित हरिणीप्रमाणें भोंवतीं पाहात होती. मदिरेप्रमाणें तिचे डोळे होते. यानंतर मध्यरात्रीं मदन विव्हळ होऊन रावण अशोकवनांत येतो. निद्रेनें व मदानें डोळे व्याकुळ झालेल्या—मदिरेक्षणी स्त्रिया त्यांच्याबरोबर होत्या. रावणाचे नेत्र वक्र, ताम्रवर्ण व विशाल होते. तो मदनासारखा होता. त्याला पाहतांच सीता रडूं लागली. उत्कृष्ट पापण्यांनीं युक्त असलेले तिचे दीर्घ व स्वच्छ नेत्र ताम्रवर्ण झाले. रावण तिच्या सौंदर्याचें वर्णन करून तिला वश करूं लागला. तो म्हणाला, "हे चंद्रमुखी, मी तुझा जो जो अवयव पाहत आहें त्याचे त्याचे ठिकाणीं माझी दृष्टि खिळून जात आहे. रामाचें वेड सोड. तूं माझी भार्या हो. हे चारुनयने तूं माझें मन हरण केलें आहेस!" सीतेनें त्याची निर्भत्सना केली. तेव्हां रावण उग्र डोळे वटारून पाहूं लागला. तूं विशिष्ट कालमर्यादेंत वश झाली नाहीस तर मी तुझ्या देहाचे तुकडे करून खाईन असें सांगून निघून गेला. नेत्रांतून चाललेल्या जलस्रावांनीं सीतेचा ऊर भिजला. ती भूमीवर पडली. परंतु नंतर तिचा डावा डोळा स्फुरूं लागला. तिला शुभ शकुन होऊं लागले. वक्र पापण्यांनीं व्यात, काळीभोर बुबुळें व सभोंवतीं श्वेतवर्ण यांनीं युक्त आणि दोन्ही बाजूंना आरक्तवर्ण असलेला शुभ डावा डोळा, सभोंवतीं आरक्तवर्ण असून मत्स्याचा धक्का लागल्यामुळें कंपन पावत असलेल्या कमलाप्रमाणें स्फुरण पावूं लागला. हनुमंतानें तिची भेट कौशल्यानें घेतली. रामाचें वृत्त तिला सांगितलें. 'हे माध्वि, तूं दृष्टीआड झाल्यानुळें रघुवंशज राम ज्वालामुखीसारखा जळत आहे. तो येऊन तुझी मुक्तता करील. तेव्हां सीतेला अनुपम हर्ष झाला. तिच्या डोळ्यांतून आनंदाश्रुहि गळूं लागले. ग्रहण सुटलेल्या चंद्रासारखी ती दिसूं लागली. रामाला खूण म्हणून तिनें एक मणि दिला व कावळ्यानें आपली चेष्टा केल्यामुळें रामानें त्याचा एक डोळा फोडला हा खाजगी वृत्तांत खुणेसाठीं सांगण्यास सांगितला.

हनुमंतानें लंका उध्वस्त केली. रावणाचें सैन्य मारलें. क्रोधानें त्याचें डोळे जळूं लागले हें ऐकतांच रावणाची दृष्टि क्रोधानें चढून गेली. चिताग्नीप्रमाणें अंगाचा भडका होऊं लागला. प्रज्वलित दीपांतून ज्योतिसह वर्तमान तेलाचे बिंदु पडतात त्याप्रमाणें त्याच्या नेत्रांतून तेजासह वर्तमान अश्रु गळूं लागले. इंद्रजितानें मारुतीला पकडून आणल्यावर हनुमान रावणाच्या तेजानें दिपून गेला. "काय हें रूप, काय धैर्य, काय बल, काय ही कांति" अशी त्यानें रावणाची मनांत स्तुति केली. परंतु रावणाची नंतर निर्भत्सना केली. पेटवलेल्या पुच्छानें लंका जाळून, सीतेस भेटून तो हनुमान परत सागर उल्लंघन करून आला.



राक्षसांचे डोळे वर्णन करतांना विविध आकारांच्या रंगांच्या डोळ्यासाठीं वाल्मिकीमुनींनीं विविध नांवें योजलीं आहेत तीसुद्धां लक्षांत घेण्यासारखी आहेत स्थूलाक्ष, शोणिताक्ष, विरूपाक्ष यूपाक्ष, अक्ष, धूम्राक्ष, मकराक्ष या नांवांनीं डोळ्यांचा बोध होतो. रावणाचा भाऊ कुबेर ह्यानें पार्वतीकडे डाव्या डोळ्यानें पाहिलें तेव्हां तिच्या तेजानें त्यांचा डावा डोळा जळून खाक झाला. उजवा पिंगट बनला. एकाक्षपिंगली असें त्याचें नांव तयार झालें. हें वर्णन उत्तर कांडांत येतें. तसेंच इन्द्रानें मोरांना आपले हजार डोळे त्यांच्या पिसाऱ्यावर राहतील असें आश्वासन दिल्याची कथा हे तेथें आहे युद्धकांडांत प्रत्येकाच्या डोळ्यांतील भयाण


अनुक्रमणिका

**नवलकथेहूनही विलक्षण !**



# देव तारीं त्याला कोण मारीं ?

दोन वर्षापूर्वी मी प्राथमिक शिक्षक म्हणून एका खेड्यांत काम करत होतो. थंडीच्या दिवसांत उबदार शेकोटीजवळ बसून गांवकऱ्यांच्या चवदार गप्पा ऐकण्याची मला संवयच लागली होती ! गेनू सुतारानें सांगितलेली ही सत्यकथा नवलकथेहूनही विलक्षण आहे.

सोमेश्वर नांवाच्या लहानशा खेड्यांत दरवर्षी चैत्री पौर्णिमेला महादेवाची जत्रा भरत असते. जत्रेच्या दिवशीं संध्याकाळीं देवाच्या रथाची मिरवणूक देवळापासून गांवाच्या वेशीपर्यंत वाजत गाजत काढली जाते. रथाची पूजा करण्याचा पहिला मान गांवच्या पाटलाकडे आहे. रथाची पूजा करण्यापूर्वी बंदूकीचे अकरा बार काढले जातात. पाटलानें पूजा केल्याशिवाय रथ जागचा हालत नाही अशी या गांवकऱ्यांची अढळ श्रद्धा आहे.

एकदां काय झालें की जत्रेच्या दिवशीं सकाळींच एका खून खटल्यासाठीं पाटलाला तालुक्याच्या गांवीं बोलावणें आलें. सरकारी काम असल्यामुळें व संध्याकाळपर्यंत येण्याची शक्यता असल्यामुळें गांवकऱ्याना ' मिरवणूकीपर्यंत नक्की येतो ' असें आश्वासन देऊन पाटील तालुक्याच्या गांवीं निघून गेले.

संध्याकाळीं गांवाकडे परतण्यासाठीं पाटलाना बराच उशीर झाला होता. आपलींपावलें शक्य तितक्या भराभर उचलत पाटील गांवाकडे निघाले होते. गांवची जत्रा असल्यामुळें रस्त्यानें सोमेश्वराचा कुणीच माणूस दिसत नव्हता.

पौर्णिमेचा चंद्र क्षितीजावर येण्यास प्रारंभ झाला. रथ ओढण्याची वेळ जवळ येऊन ठेपली. देवाचा कोप होऊ नये म्हणून भोळ्या भाविक पाटलानें जोरानें पळण्यास सुरवात केली. पहातां पहातां त्यानें गांवची शीव ओलांडली. रथ ओढण्यापूर्वी होणाऱ्या मंगळ वाद्यांचा आवाज आतां स्पष्टपणे ऐकूं येत होता. थोड्याच अंतरावर त्यांची वाट पहात बसलेली दोन तीन माणसे दिसत होती. पाटलांची छाती भरून आली होती. पाय थकले होते तरीहि त्यानीं जोरानें धावण्यास सुरवात केली आणि एकाकी पाटील जमीनीला खिळून स्तब्ध उभे राहिले.

—रस्त्यावरून जाणाऱ्या नागावर पाटलांचा पाय पडला होता आणि रागावलेल्या नागानें पाटलांचा पाठलाग करून त्यांच्या पुढ्यांत फणा काढून पहाण्यास व फुत्कारे सोडण्यास सुरवात केली होती. आतां मात्र पाटलांचा धीर सुटला. दोन्ही हात जोडून पाटलानें देवाची करुणा भाकण्यास सुरवात केली ' देवा मी मरणाला भीत नाहीं पण मरण्याआधीं तुझ्या रथाला हात लागू दे '. पाटलांच्या मनांत हा विचार येतो न येतो तोंच चमत्कार घडून आला. पाटलांची वाट पाहून गांवकऱ्यानीं त्यांच्या मुलाच्या हातानें पूजा करण्यास सुरवात केलीं आणि एका मागून एक येणाऱ्या अकरा बंदूकीच्या आवाजानें घाबरलेल्या नागानें झाडाच्या वळचणींत पळ काढला.

पाटलांचा आपल्या डोळ्यावर विश्वास बसत नव्हता. तशाहि परिस्थितींत त्यानीं गांव गांठला. पूजा संपत आली होती. पाटलानें थरथरत्या हातानें रथाला कुंकू वाहिले. पाटलांचा हात लागतांच रथाची मिरवणूक मोठ्या थाटानें निघाली.

नाग डाव धरतो म्हणतात ! पण अद्यापहि त्या पाटलांना नाग भेटला नाहीं. म्हणतात ना देव तारी त्याला कोण मारी ?

— रघु बोरगांवकर, सोलापूर

---

वा कारुण्यपूर्ण भावाचें ठिकठिकाणी वर्णन आलें आहे. अवाढव्य शरीर असलेल्या कुंभकर्णाचे डोळे गाड्याच्या चाकासारखे आहेत. ते अग्निप्रमाणें देदीप्यमान व विजेसारखे उज्वल असून मोठ्या ग्रहासारखे दिसत. ते डोळे वटारल्यावर कसे दिसले असतील ? अपशकुनानें त्याचा डावा डोळा स्फुरण पावला तेव्हां कसा थडथडला असेल ? क्रोधानें कुंभकर्णाचे आरक्त नेत्र रक्ताने व्याप्त झाले होते. अशा कुंभकर्णास पाहून वानर सेना पळाल्यास नवल नाही. रामरावणांच्या सैन्यांत भयानक संग्राम घडतो; रावणाचे पुत्र मरतात तेव्हां रावणाचे नेत्र अश्रूंच्या लोटांनीं भरतात. क्रुद्ध होऊन युद्ध करतांना त्याच्या डोळ्यांतून तप्ताश्रु गळतात. त्याच्या अश्वांच्या डोळ्यांतूनहि पाणी गळतें. राम हा रावणवधाची प्रतिज्ञा करून म्हणतो कीं " गरुडाच्या दृष्टीस पडलेला भुजंग ज्याप्रमाणें जिवंत परत जाण्यास समर्थ होत नाहीं, त्याप्रमाणें सर्पासारख्या विषयुक्त दृष्टीनें संपन्न असलेल्या माझ्या दृष्टीस पडल्यानंतर रावण जिवंत जाणें शक्य नाहीं. " तर लक्ष्मण मूर्च्छित पडतांच त्याच्या डोळ्यांना अंधारी येते. शेवटीं रामानें रावणाचा वध केला तेव्हां आरक्त मेघांत स्फुट झालेल्या विजेप्रमाणें मंदोदरी रावणाच्या अंगावर, वक्षांवर डोकें ठेऊन रडली. हे सारें युद्ध संपल्यानंतर—' सीता तुझ्या दर्शनासाठीं उत्सुक आहे ' असा निरोप हनुमानानें सांगतांच रामाच्या डोळ्यांत पुन्हां पाणी आलें. रामाच्या विजयामुळें देवांनीं रामाची स्तुति केली तेव्हां, " तुझ्या डोळ्याची पापणी मिटणें ही रात्र असून ती उघडणें हा दिवस होय " असा अभिप्राय ब्रह्मदेवानें व्यक्त केला.

सीतेच्या मुक्तीनंतर—' तूं आतां कोठेंहि जा, माझ्या पराक्रमाचें सार्थक झालें ' असें राम म्हणाला तेव्हां सीता रडूं लागली. राम पुढें म्हणाला हा खटाटोप मी तुझ्यासाठीं केलेला नाहीं. तर आपल्या प्रख्यात वंशाला आलेला कमीपणा नाहींसा करण्याकरतां मीं हें केलें. हे भद्रे, दहा दिशा तुला मोकळ्या

( पान ३४ वर चालू )

# एक होतां म्हातारा ....

सुधाकर तोर्णे



*इतरांना कदाचित् तो रुक्षीस वाटत असेल; पण तिचा बापडीचा तो अगदीं सर्वस्व होता. आणि एकमेकांच्या गळ्यांत गळा घातलेले त्यांना पाहिलें कीं माझा आदर वाढत असे !...*

तुम्ही आत्तां त्या म्हाताऱ्याविषयीं कांहीं विचारलंत का ? माफ करा हं. मला आपलं वाटलं तसं. इथं या भागांत तुम्ही सुट्टीनिमित्त आलेले दिसतां उन्हाळ्यांत येतात इथं खूप प्रवासी आणि हा अवघड डोंगरमाथा ओलांडून बहुधा प्रत्येक जण या वाळूंत येतो, आणि क्षणभर थांबून समोरच्या समुद्राकडे आणि पलीकडच्या सरोवराकडे पहात रहातो. आतां तुम्हीं पहात अहांत ना, अगदीं तस्से.

किती सुरेख ठिकाण आहे नाहीं ! शांत आणि निर्जन त्या म्हाताऱ्यानं रहायला ही जागा कां पसंत केली याचं तुम्हांला आतां आश्चर्य वाटायला नको. खरं ना ?

तो प्रथम केव्हां इथं रहायला आला तें मला नाहीं आठवत बुवा. मला वाटतं तें कुणालाच आठवत नसेल. फार फार वर्षांपूर्वींची गोष्ट असेल ती. मी आलों तेव्हां तो इथं होता. आणि मीं तर युद्धापूर्वीं बराच आधीं इथं आलों. कदाचित् या सुसंस्कृत जगापासून पळून जावं म्हणून तो इथं आला असेल. अगदीं माझ्यासारखाच म्हणा ना. किंवा कदाचित् जिथं तो रहात होता तिथं आसपासच्या मंडळींनी त्याला रहाणं असह्य केलं असेल. खरं कारण कळणं अवघडच आहे. मला मात्र अगदीं पहिल्या दिवसापासून वाटायचं कीं त्या वेड्यानं स्वतः कांहींतरी अघटीत केलं असावं किंवा दुसऱ्या कुणीतरी त्याचं कांहीं तरी बिघडवलं असावं आणि म्हणून त्याची या जगाविरुद्ध तक्रार असावी. मला नक्की आठवतंय कीं जेव्हां मी पहिल्यांदा त्याला न्याहाळलं तेव्हांच मी स्वतःशी म्हणालों — "पैज मारून सांगतो, हा म्हातारा कांहीं असा तसा नाहीं. अगदीं मासलेवाईक प्राणी आहे."

होय ना, तो तिथंच सरोवरापाशींच रहायचा. त्याची सहचरी होती बरोबर. मोठं गंमतीदार जोडपं होतं. उन्हाळा असो, पावसाळा असो, आपले उघड्यावर वावरायचे. त्यांच्या गांवींही नव्हतं बदलतं हवामान.

मी त्या जोडप्याच्या फारसा जवळ जात नसे. कारण मला कुणी तरी बजावलं होतं कीं, कुणीही जवळ फिरकलेलं त्यांना खपत नाहीं. आणि दुसरं एक कारण म्हणजे त्यांच्या भाषेचं मला अक्षर सुद्धां कळत नव्हतं. मी आपला दुरून दुर्बिणींतून त्यांना पहायचा.

तो बराच रुंद बांध्याचा आणि बळकट होता. वय बरंच उतार असावं. किती तरी वर्षांपूर्वींची गोष्ट सांगतोय मी तुम्हांला. पण आत्तां तो दिसतोय ना तस्साच तेव्हां दिसायचा. किनाऱ्यावरी मान लांब करून दूरच्या गलपक्ष्यांकडे नाहीं तर लाटांकडे टक लावून पहात असायचा.

पहिल्यांदा मी जेव्हां त्याला पाहिलं, तेव्हां त्याची सहचरी कांहीं मला दिसली नाहीं. बहुधा ती जवळपास नसावी. आणि मग जेव्हां ती मला दिसली, तेव्हां माझी खूपच निराशा झाली. तिच्यांत पहाण्यासारखं असं कांहींही नव्हतं. म्हणजे मला असं म्हणायचं आहे कीं, त्याच्याकडे पहातांच त्याच्या विशिष्ट स्वभावाचं दर्शन होई. तसं





अनुक्रमणिका

कांहीं तिच्याकडे पाहून होत नसे. नुसतं आपलं वाटायचं कीं, आहे झालं मामुली, थंड प्रकृतीचा एक प्राणी.

मी जेव्हां त्यांना जोडीनें पाहिलं, तेव्हां ते दोघे बहुधा माशांची पारध आटपून परतत असावेत. तो अर्थातच पुढें होता. ती त्याच्या मागून मागून रखडत होती. सुदैवानें दोघांपैकीं कुणीही मला पाहिलं नाहीं. आणि एकाअर्थी तें बरंच झालं. कारण त्या म्हाताऱ्यानं मला पाहिलं असतं तर तो थांबला असता, त्यानं तिला घरी जायला सांगितलं असतं आणि तो दगडांच्या राशीजवळ जिथं मी बसलों होतों तिथवर आला असता. तुम्ही विचाराल कीं म्हाताऱ्यानं तसं केलं असतं तर मी काय म्हटलं असतं. खरं सांगूं ? मला तरी कुठें ठाऊक आहे. कदाचित मी त्याला पाहिला न पाहिल्यासारखा करून तिथनं उठलों असतो आणि शीळ घालीत चालूं लागलों असतों. कदाचित् त्याच्याकडे हंसून पाहिलं असतं. पण मला नाहीं वाटत त्यानें कांहीं केलं असतंस. त्यानं नुसतं डोळे बारीक करून माझ्याकडे एकदां पाहिलं असतं आणि मला जाऊं दिलं असतं.

त्यानंतर उन्हाळ्या हिवाळ्यांत मी अनेकदां समुद्राच्या वाळूवर नाहींतर किनाऱ्यालगतच्या खडकांत जाऊन बसत असे. आणि प्रत्येकवेळीं न चुकतां ती जोडी मला दिसायची. कधीं त्यांची मासेपारध चाललेली असायची नाहींतर कधीं नुसतीच सहल चाललेली असायची. क्वचित एखाद वेळीं त्यांची माझी गांठ बंदरांत सुद्धां पडायची. बहुधा पाण्यांत नांगरून पडलेल्यां होड्या-गलबतांकडे बघत असायचे दोघेहि. बंदरांतल्या धांवपळीच्या वातावरणांत यायची सूचना त्या दोघांपैकीं कोण करीत असावं याची मला कांहींच कल्पना नाहीं. पण मला वाटतं, त्याला अकस्मात धकाधकीच्या जीवनाची आठवण होऊन तो म्हणत असावा, "आज आपण शहरांत जायचं बरं का ?" आणि ती बापडी, त्याला जें आवडेल तें करायचं असं व्रत असल्यामुळें त्याच्या पाठोपाठ येत असावी.

हें पहा, एक गोष्ट सांगायचीच राहिली ! आणि ती म्हणजे त्या जोडीचं परस्परांबद्दलचं प्रेम. मला तें आपोआप दिसायचं बरं का. तो मासेपारध आटपून परतत असायचा, आणि ती घरीं एकटीच असायची. संध्याकाळीं ती त्या सरोवरापाशीं यायची, आणि त्याची वाट पहात रहायची. तिला तो दुरून येत असलेला दिसायचा. तो सरळ तीरासारखा वेळूवर यायचा आणि ती त्याला भेटायला पुढें सरकायची. आणि मग ते एकमेकांच्या गळ्यांत गळा घालायचे. आजूबाजूला कुणी पहात असेल याची पर्वाहि नसायची त्यांना. खरोखरच तो देखावा मोठा हृदयस्पर्शी असायचा. मी काय म्हणतोंय तें कळतंय ना तुम्हांला. पहाणाऱ्यालाहि असं वाटल्याशिवाय रहात नसे कीं या म्हाताऱ्याकडे कांहीं तरी माया करण्यासारखं आहे. इतरांना कदाचित् तो खवीस असेल पण तिचा बापडीचा तो अगदीं सर्वस्व होता. आणि तसं त्यांना एकत्र पाहिलं कीं त्या म्हाताऱ्याबद्दलचा माझा आदर वाढत असे.

त्यांना परिवार होता कीं नाहीं असं विचारलंत ना ? पण मीं येतोय त्या मुद्याकडे. खरं म्हणजे त्या परिवाराबद्दलच मला तुम्हांला सांगायचं होतं कारण ती एक शोकांतिका आहे. आणि माझ्याशिवाय अन्य कोणालाही ती ठाऊक नाहीं. मला वाटतं कीं ती मला कुणाला तरी सांगतां आली असती, पण ती मीं सांगितली असती तर...पण नकोच तो विचार. कारण मग त्यांनीं त्या म्हाताऱ्याला नेलं असतं. आणि ती बिचारी त्याच्या विरहानं धाय मोकलून रडली असती. आणि शिवाय झालेलं कांहीं परत येणार नव्हतं. तसं पाहिलं तर त्या म्हाऱ्याविरुद्ध पुरावा बळकट होता परंतु निश्चित असा नव्हता. कदाचित तो अपघातही असूं शकेल. कुणी सांगावं कांहींहि असो तो मुलगा जेव्हां नाहींसा झाला तेव्हां चौकशी अशी कोणीही केली नाही इतकं मात्र खरं. तेव्हां मला एकट्याला कुणी सांगितले होते ते नसते उपद्व्याप ?

मी तुम्हांला तें सारं क्रमाक्रमानं सांगण्याचा प्रयत्न करतो हं. पण

---

(पान ३२ वरून चालू)

आहेत. तुझ्याशीं मला आतां कांहींएक कर्तव्य नाहीं...तूं लक्ष्मण, भरत शत्रुघ्न, सुग्रीव, बिभीषण राक्षस यांपैकीं कोणाहि जवळ राहा." रामाच्या तोंडांतून या प्रकारचं भाषण ऐकतांच सीता रोदन करूं लागली आणि गजेन्द्राच्या शुंडेचा तडाखा बसलेली वेली ज्याप्रमाणें पुष्पें गाळते त्याप्रमाणें ती एक सारखी टपटप अश्रु गाळूं लागली.

सीतेचा स्वीकार करून नंतर केलेला त्याग सीतेचा भूमिप्रवेश, रामानें लक्ष्मणाचा त्याग केल्यामुळें शरयू तीरीं जाऊन लक्ष्मणानें देह ठेवला. हा भाग व रामाचे महाप्रस्थान हे सारे कथाभाग हृदय पिळवटून टाकणारे आहेत. यामुळें रामायणाला एका शोकान्तिकेचं स्वरूप प्राप्त होऊं लागतें. हें प्रसंग कलादृष्ट्या मोलाचे व जीवनदर्शनाच्या दृष्टीनें रामायणाचा कस वाढविणारें आहेत. सामान्य माणसाला विस्मयांत टाकणारे आहेत. रामायणाचें अपरिमित वैभव पाहिलें कीं मन आश्चर्यानें थक्क होतें. आपल्या दृष्टीच्या जाळ्यांत हें महान कथाविश्व पकडणाऱ्या व अलौकिक सामार्थ्यानें त्याचा कलात्मक आविष्कार करणाऱ्या वाल्मीकीचें बुद्धिवैभव मनाचीं सामर्थ्यें, यांचा विचार करतांना मन विस्मित होतें. हा एवढा भूप्रदेश, विविध संस्कृति, विविध शास्त्रें, विविध मानवी नमुने, विविध पशु-पक्षी, हरतऱ्हेचा निसर्ग, केव्हां व कसा पाहिला असेल ? ते बघणारे व त्या आशयाला कलात्मक रुप देणारे वाल्मीकि मुनींचे डोळे कसे असतील ? विविध प्राणिमात्रांच्या विविधरुपी डोळ्यांच्या अनंत छटा दर्शविणारे वाल्मीकिमुनींच डोळे केवढे असतील ? त्यांच्या ज्ञानदृष्टीची गति कशी असेल ? विचार करतां करतां मनाला एक कल्पना सुचूं लागते, व आसनस्थ वाल्मीकिमुनी रामायण गातांना दिसतात. भारताच्या दक्षिण टोकाला सागरतीरीं पोर्णिमेस चंद्र उगवत असतो त्याच वेळीं सूर्य मावळत असतो. समतोल राहिलेले आरक्त पण तेजःपुंज चन्द्रसूर्य हे ज्याचे डोळे आहेत, अंतरिक्ष हें ज्याचें मुख आहे, आकाश ही ज्याची टाळु आहे, अथांग सागरासारखी ज्याची जिव्हा आहे असा हा महाकवि रामायणाचें गान धीरगंभीरपणें करीत आहे—जवळ असलेली पृथ्वी त्या महामुनीच्या कमंडलूसारखी आहे...







अनुक्रमणिका

एक गोष्ट लक्षांत ठेवा कीं तें सारं घडायला बराच कालावधि लागला. आणि त्या काळांत कांहीं वेळा मी माझ्या कामांत होतों. म्हणून सरोवराजवळ जाऊं शकलों नाहीं तर कांहीं वेळां मी घरींच नव्हतों. दुसरं म्हणजे त्या जोडप्याकडे माझ्याशिवाय अन्य कोणीहि लक्ष देत नसे त्यामुळें जें जें म्हणून मी माझ्या स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिलं त्याचीच ही कथा सांगतोय. कुणाकडून ऐकलेलं किंवा दंतकथा यांचा त्यांत जरासुद्धां भाग नाहीं.

होय ना, आत्तां दिसताहेत तसे ते त्यावेळीं कांहीं नेहमीच एकटे नसत. त्यांना चार बाळं होतीं. तीन मुली आणि एक मुलगा. सरोवराला लागूनची ती ओसाड जागा आहे ना, तिथंच त्यांनीं त्या बाळांना वाढवलीं. आणि मला आपलं नेहमीं आश्चर्य वाटायचं कीं त्या घाणेरड्या अडचणीच्या जागेंत तीं रहातात तरी कशी. विशेषेंकरून पावसाच्या दिवसांत वरून मोठे मोठे थेंब पडताहेत. वारा भणभणतोय आणि सरोवराचं पाणी मर्यादा उल्लंघून आजूबाजूला पसरतंय. अशा दिवसांत ती म्हणून तिथं दिवस काढत होतीं. दुसरा एखादा शहाणा असता तर अशा दिवसांत आपल्या सहचरीला आणि बाळांना घेऊन एखाद्या निवाऱ्याच्या जागीं नक्कीच गेला असता. पण तो म्हातारा तसा चिवट बरं का आणि तो तिथनं हलत नाहीं, म्हणून मला वाटतं तीही तिथंच राहिली. आणि म्हणून बाळंही तिथंच राहिली.

बाळं मोठीं आकर्षक होतीं विशेषेंकरून अगदीं छोटी छोकरी. त्यांची नांवं कांहीं मला कळलीं नाहींत. त्या छोकरीला मी म्हणत असे छबडी. दिसायला ती बापाच्याच वळणावर गेली होती. आणि त्या मुलाला मी नांव ठेवलं होतं छबडा. तो त्या सर्व भावंडांत मोठा होता. पण तुमच्या माझ्यांत सांगायचं तर बेटा जरासा खुळसटच होता. कारण त्या मुली आपणहून खेळायच्या, नाचायच्या, बागडायच्या. आणि हा बेटा त्यांच्या मागेमागे लोंबकळायचा. जणूं काय करावं तें न समजल्यासारखा. आणि जेव्हां जेव्हां जमेल तेव्हां तो बहुधा घरींच असायचा; आपल्या आईच्या भोंवती भोंवती. ती मात्र चौघाही बाळांना अगदीं सारखं वागवायची. मात्र तिचं अधिक लक्ष म्हाताऱ्याकडेच असायचं. निदान मला तरी तसं वाटायचं.

आपल्या आईवडिलांप्रमाणें हीं बाळंही आपली करमणूक आपणच करून घेत असत. स्वतःहून मुद्दाम किनाऱ्यावर तीं कधीं आलीं आणि खेळलीं नाहींत. वस्तुतः उन्हाळ्यांत किनाऱ्यावर येणं मोठं गंमतीचे वाटत असे. किती तरी माणसं ते मोठाले दगड ओलांडून किनाऱ्यावर उन्हाळ्यांत सहलीसाठीं म्हणून येत असत. मला वाटतं कदाचित् त्या म्हाताऱ्यानं त्यांना बजावून सांगितलं असेल कीं परक्यांपासून दोन हात दूर रहा. आणि म्हणूनच तीं किनाऱ्यावर आपणहून येणं टाळीत असत.

माझं त्यांच्या जवळून जाणं त्यांना बहुधा परिचयाचं झालेलं असावं. आणि सरोवराच्या कांठीं तीं बाळं खेळत असतां मी अनेकदां तिथं उभा राहून त्यांचा खेळ पहात असे. अर्थात् त्यांच्याशीं कधीं माझी बोलीभाषा नव्हती. कारण त्यांनी लगोलग जाऊन त्या म्हाताऱ्याला सांगितलं असतं. मी जातां येतां तीं हळूंच आपली मान उचलून माझ्याकडे पहात आणि लगेच दुसरीकडे मान वळवीत, जरा लाजल्यागत. पण त्यांतली छबडी मोठी लबाड. ती नुसतीच पहात नसे तर जरा धिटाईनं थोडासा पिंगा घाली. जरा ऐटींत नाचे बागडे.

कधीं कधीं त्या सहाही जणांना मासे पारधीसाठीं एकत्र निघालेलं मी पहात असे. अर्थात्च तो म्हातारा त्यांचा कप्तान बनत असे. छबडी बापाला बिलगून, अगदीं त्याला मदत करणं आवश्यक आहे अशा थाटांत असायची. सहचरी आजूबाजूला पहात हवामान ठीक राहील कीं नाहीं त्याचा अंदाज घेत असायची तिच्या दोन्ही अंगाला दोघी लेकी असायच्या. आणि छबडा मात्र सर्वांच्या मागून घर सोडायचा. बऱ्याच उशिरापर्यंत ती सारीं परतत नसत. आणि ती परतायच्या वेळेपर्यंत मी किनाऱ्यावरून घरीं गेलेला असायचा. पण माझा आपला तर्क आहे कीं त्यांची ही सहल मजेशीर होत असावी. पकडलेल्या माशांवरच तीं

## पालुपद : १



**व्याख्या**—जेव्हां एकाच—विशेषतः ठसकेबाज-वाक्याचा बोलण्यांत अनेक वेळां उपयोग केला जातो तेव्हां हा अलंकार होतो. (या अलंकाराचा उपयोग विशेषतः स्त्रीवर्गाकडून केला जातो.)

**उदा.—**

**(१) तरी मी तुम्हांला सांगत होतें.**

एकही लग्न झालेला (विचारा) पुरुष नसेल, ज्यानें आपल्या सौभाग्यवतीकडून हें वाक्य लग्नानंतर रोज निदान दहा वेळां तरी ऐकलें नसेल. स्त्रीवर्गाचें हें फार आवडतें वाक्य आहे. या वाक्याचा उपयोग त्या कारण असतां-नसतां सारखा करीत असतात. तुम्हीं कितीहि चांगल्या हेतूनें कुठलीहि गोष्ट करा—त्या त्यांत कांहींतरी खोड काढतील, कसेंहि करून तुमची नसलेली चूक तुम्हांला पटवून देतील, आणि शेवटीं म्हणतील, "तरी मी तुम्हांला सांगत होतें." "काय सांगत होतीस, बोडकं ?" असा प्रश्न सौभाग्यवतीला विचारण्याचा मोह तुम्हांला अनावर होतो. कारण तिनें तुम्हांला या बाबतींत कांहींच सांगितलेलें नसतें. तेव्हां या वाक्याला कांहीं अर्थ नसून तें केवळ एक ठसकेबाज निरर्थक वाक्य असल्याचें पुरुषवर्गानें लक्षांत ठेवावें. तो केवळ एक अलंकार आहे.

अनुक्रमणिका



तो दिवस काढीत असावीत. नाहींतरी मासा म्हणजे जीवनसत्त्वांचं आगरच नाहीं का? त्या दृष्टीनं कदाचित तो म्हातारा जीवनसत्त्वांच्या बाबतींत छांदिष्ट असावा.

काळ धांवत होता आणि तीं बाळं वाढत होतीं. छबडीचं गोजिरवाणं स्वरूप ती वाढायला लागतांच नष्ट झालं. निदान मला तरी तसं वाटलं. ती इतर दोघीं सारखीच दिसायला लागली. तें तिन्ही बहिणींचं त्रिकूट फारच सुंदर दिसत असे. तिघीही अगदीं शांत आणि व्यवस्थित वागणूकीची होती.

आणि छबड्याबद्दल विचाराल तर होता आपला वेडाबगडा. अंगपिडानं त्या म्हाताऱ्या एवढा असला तरी दिसायला मात्र बापाच्या उलट होता बेटा. बापाची ताकद, रुबाबदार व्यक्तिमत्व त्याच्यांत जरासुद्धां नव्हतं. आणि सर्वांत मोठी भानगड म्हणजे बापाला त्या मुलाची लाज वाटत असे. घरांतही त्याचं वजन नव्हतं. माझी खात्रीच आहे त्याबाबत. आणि मासेमारीबद्दल म्हणाल तर तो शंभर टक्के निरुपयोगी होता. त्या मुलीमात्र मधमाशांसारख्या खपत असलेल्या आढळत. आणि छबडा मात्र मुलगा असून नेहमींच मागें मागें राहात असे. आई असली तर बहुधा तिच्या भोंवतीभोंवतीच घुटमळत असायचा.

अशा प्रकारचा मुलगा पोटीं आल्यामुळें तो म्हातारा अस्वस्थ झाल्याचं मला नेहमीं दिसत असे. आपण एवढें वाढलों आहोंत हें त्या मठ्ठ डोक्यांत येतच नसे. सर्वसाधारणपणें कोणत्याहि कुटुंबांत एखादा मुलगा एवढा वाढलेला असता तर निश्चितच घराबाहेर पडून कामधंद्याला लागला असता. माझ्या मनांत नेहमीं यायचं कीं संध्याकाळीं घरीं परतल्यावर तो म्हातारा आणि त्याची सहचरी यांच्यांत त्या मुलाबद्दल कडाक्याची चर्चा चालत असेल किंवा तो मुलगा निरुपयोगी आहे याबद्दल दोघांचंहि एकमत होत असेल.

आणि खरं सांगायचं म्हणजे एक दिवस त्या मुलांनीं घर सोडलं एकदाचं. निदान त्या मुलींनीं तरी सोडलं.

मी सारं कांहीं सांगतों क्रमाक्रमानं.

त्याचं असं झालं, पावसाळ्याचे दिवस होते. या ठिकाणापासून तीन मैल दूर असलेल्या एका गांवीं मी कांहीं तरी खरेदीला एक दिवस गेलों होतों. आणि अकस्मात मला तो म्हातारा दिसला. त्याची सहचरी, त्या तीन लेकी आणि थोरला लेक घेऊन स्वारी बंदराच्या आसपास घुटमळत होती. सर्वांनीं नुकत्याच आंघोळी आटोपल्या होत्या असं दिसत होतं. तो म्हातारा कुणाला तरी भेटायला सहकुटुंब आला असावा असं मला घटकाभर वाटलं. अर्थात् तसं असलं तर ती मोठी नवलाची गोष्ट होती. कदाचित् त्यांचे स्नेही किंवा परिचित जवळपास असतील आणि मला त्यांची अजिबात माहिती नसेल हेंहि शक्य आहे. कांहींही असो त्या दिवशीं त्या सबंध कुटुंबाला एकत्र असं मी अखेरचच पाहिलं.

पुढें आठवडाभर पावसाचा जोर फारच वाढला म्हणून मी घराबाहेर पडलोंच नाहीं. समुद्रावर वादळ झालं होतं आणि प्रचंड लाटा किनाऱ्यावर आदळत होत्या. त्यामुळं तो म्हातारा आणि त्याचं कुटुंब परत आलं असेल कीं नाहीं याबद्दल मी साशंक होतों. ते आपल्या मित्राकडेच राहिले असतील तर बरं होईल असंही माझ्या मनात येऊन गेलं.

मला वाटतं तो मंगळवार असावा वारा पडला होता. वादळही शमलं होतं. मी घराबाहेर पडून सरोवराच्या कांठच्या त्या म्हाताऱ्याच्या घराकडेच नजर टाकली. आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे तो म्हातारा आपल्या सहचरी बरोबर तिथं होता पण मुलांचा मात्र पत्ता नव्हता.

मला जरा चमत्कारिक वाटलं. आसपास कुठेंतरी गेली असतील तर परतल्यावर दिसतील म्हणून मी जरासा रेंगाळलों. माझी दुर्बिण डोळ्यांना लावून दूरवर पाहिलं. पण फुकट. म्हातारा नेहमीप्रमाणे मासे पकडीत होता आणि त्याची सहचरी स्वस्थ बसून ऊन खात होती त्याचा अर्थ इतकाच कीं त्यांनीं मुलांना बहुधा आपल्या मित्राकडे त्या गांवीं ठेवलं असावं.

आरंभी जरी चमत्कारिक वाटलं तरी मागाहून मी सुटकेचा श्वास टाकला. कारण माझ्या मनाला एक शंका चाटून गेली कीं तें सारं कुटुंब परततांना ते वादळांत तर सांपडले नाहींत ना? आणि त्यांतून फक्त दोघेच सुखरूप आले का? पण तसं असणार नाहीं. तसं असतं तर तो अपघात माझ्या कानीं आला असता. निदान कुणी तरी कांहीं तरी त्याबाबत निश्चितच बोललं असतं. शिवाय तसं झालं असतं तर तो म्हातारा आणि ती नेहमीसारखे कसे दिसले असते?





अनुक्रमणिका

परंतु मी जरी सुटकेचा श्वास टाकला असला तरी त्यांची उणीव मला जाणवायची. संवय झाली होती ना त्या सगळ्यांना एकत्र पहायची म्हणून थोडं उदासवाणं वाटायचं. कधीं कधीं मनांत यायचं कीं तीं सारीं बाळं आपल्या भल्याकरितांच दूर गेलीं असतील. लहानाची मोठी तीं माझ्या डोळ्यांदेखत झालीं होतीं आणि आतां एकाएकी नाहींशी झाली होतीं.

माझ्या असंही मनांत येई कीं त्यांच्या भाषेचे चार दोन शब्द मला येते तर मी त्यांच्याकडे, त्यांचा एक शेजारी म्हणून गेलों असतों आणि विचारलं असतं—" काय हो ! तुम्ही दोघेचसे ? ठीक आहे ना एकूण ?"

पण त्याचा कांहीं उपयोग मात्र झाला नसता. त्यानं आपल्या चमत्कारिक डोळ्यांनी मला न्याहाळलं असतं आणि मसणांत जायला सांगितलं असतं.

त्या मुलींना मी तदनंतर कधींही पाहिलं नाहीं. चुकूनसुद्धां नाहीं. त्या कधीं परत आल्याच नाहींत. एकदां छबडीला मात्र एका घोळक्यांत पाहिल्यासारखं वाटतंय. पण माझी खात्री नाहीं त्याबाबत आणि तीच जर छबडी असेल तर तिच्यांत खूपच बदल झालेला मला आढळला. आतां मात्र मला असं वाटतं कीं त्या म्हाताऱ्यानं विशिष्ट हेतू मनांत धरून त्या मुलांना आपल्याबरोबर नेऊन मित्रांकडे ठेवलं असावं किंवा तुमचं तुम्हीं पाहून घ्या असं बजावून दूर लोटलं असावं.

माझी खात्री आहे कीं तुम्हांला हें बोलणं जरा चमत्कारिक वाटलं असेल. कारण तुम्ही कांहीं आपल्या मुला-मुलीकडे असं वर्तन करणार नाहीं. पण इतकं लक्षांत घ्या कीं तो म्हातारा मोठा तऱ्हेवाईक प्राणी होता. कदाचित त्यांचं भलं व्हावं अशा विचारानं त्यानं त्यांना लोटलं असेल. आणि म्हणून त्या मुलींच विशेषें करून छबडीचं पुढें काय झालं हें मला कळतं तर मी विशेष काळजी केली नसती.

पण पुढें मुलांचं काय झालं हें मी स्वतःच्या डोळ्यांनी पाहिल्यामुळं त्या मुलींचीही मला काळजी वाटूं लागली.

छबडा खरोखरच भोळसट होता. कारण बेटा परत आला. जवळ जवळ तीन आठवड्यांनीं तो परत आला. मी असाच किनाऱ्यावरून फिरून एक दिवस परतत होतों. आणि सहज म्हणून त्या म्हाताऱ्याच्या घराकडे माझी दृष्टि गेली तर मला छबडा दिसला एकदम. तो उभा होता आपला झाडापाशीं जरा गोंधळल्यासारखा दिसत होता. त्याला हांक मारावी म्हटलं तर तो माझ्यापासून खूप दूर होता आणि शिवाय मला तितका धीरही झाला नाहीं. पण मी उभ्या उभ्याच त्याच्याकडे नीट पाहिलं. तो वेंधळा दूर उभ्या असलेल्या म्हाताऱ्याकडे एकटक नजरेनं पहात आहे असं मला वाटलं.

त्या म्हाताऱ्यानं आणि त्याच्या सहचरीनं छबड्याकडे काडीचं लक्ष दिलं नाहीं. ते मासे मारायला जात असावेत किंवा मासे मारून परतत तरी असावेत. आणि वाटेंतच हा आपला उभा होता. वेंधळ्यासारखा किंवा खरं सांगायचं तर घाबरल्यासारखा.

( पान ३९ वर चालू )



## शरीरस्य कथा रम्या।

# कर्णिका

— रा. वि. सोवनी

एकदां बादशाहानें बिरबलला विचारलें होतें कीं "खरे आणि खोटे यांत अंतर किती ?" बिरबलनें तावडतोब उत्तर दिलें कीं "चार बोटें" कारण डोळा आणि कान ह्यामध्यें चार बोटांचें अंतर असतें. म्हणजे डोळा तेवढा खरा आणि कान मात्र खोटे. पण मी आतां जे कानासंबंधी लिहीणार आहे ते मात्र सत्य आहे आणि दुसरे म्हणजे ते तुम्ही वाचणार आहांत ! तेव्हां खरं आहे हें नक्कीच.

आपल्याला बाहेरून जे कान दिसतात तेवढेंच मात्र श्रवणेंद्रिय आहे असें समजूं नका. कारण ऐकण्याचें खरे कार्य करणारी यंत्रणा आंतल्या बाजूला आहे. बाह्य कर्ण हा श्रवणेंद्रियाचा पहिला भाग नंतर मध्य आणि आंतर कर्ण असे भाग असतात. बाहेरचा कान म्हणजे निसर्गानें सर्व सस्तन प्राण्यांना दिलेली एक देणगी आहे. कारण त्यामुळें आपण ध्वनिलहरी गोळा करूं शकतो. इतर सस्तन प्राण्यांना हे कान हलविता येतात. गायी म्हशी ह्या कानाचा उपयोग माशा हकलण्यासाठीं करतात. तर कुत्रा मांजर हे प्राणी आवाजाच्या दिशेला कान टवकारून जादा ध्वनिलहरी ग्रहण करतात. आणि म्हणूनच ह्या प्राण्यांना आपल्यापेक्षां जास्त चांगले ऐकावयास येते. आपल्या कानाखालीं सुद्धां तो हलविण्यासाठीं स्नायू आहेत. पण गंमत अशी कीं त्याचा उपयोग मात्र आपल्याला करता येत नाहीं. (आणि तरीसुद्धां कांहीं व्यक्ति मात्र आपले कान हलवूं शकतात हं !) दुसरें असें कीं, ह्या बाह्य इंद्रियाचा उपयोग स्त्रियांनी मात्र फार वेगळा करून घेतला आहे. कर्णभूषणे लावण्यासाठीं कानाच्या पाळीचाच नव्हे तर वरच्या भागाचाहिं त्या उपयोग करतात. त्यामुळें त्यांचे कान मात्र जड होतात. शिक्षकांना मात्र ह्याचा उपयोग विद्यार्थ्यांना कानपिचक्या देण्यास होतो. (माफ करा हं ! पण आधुनिक शिक्षण तंत्रांत हा मार्ग वापरण्यास बंदी आहे.) पुरुषांना ह्या बाह्य कर्णाचा फार त्रास केश कर्तनाचें वेळीं होतो. कारण नापिक वर्ग ह्या कानांवर एकसारखे प्रहार करीत असतो. पण हा कान इतका चिवट आहे कीं, त्याला कितीहि थप्पड्या मारल्या तरी पुन्हा पूर्वीसारखाच राहातो.

ध्वनिलहरीं ह्या कर्णांतून आंत जातात. त्यांना जाण्यासाठीं एक मार्ग आहे. त्याला कर्णनलिका म्हणतात. आपण त्याचा उपयोग काड्या घालण्यासाठीं करतो हे निराळें. कर्ण नलिकेत तेलासारखा





चिकट पदार्थ निर्माण करणाऱ्या ग्रंथी आहेत. त्यामुळें कानांतून आंत जाणारीं धूळ अडकवली जाते. कर्ण नलिकेंतून आंत गेलेल्या ध्वनिलहरीं मध्यकर्णाच्या पडद्यावर आदळतात. ह्या पडद्याला आंतल्या बाजूनें तीन छोट्या हाडांचीं एक मालिका असतें. ही मालिका आंतकर्णाच्या शंकाकृति भागाला जोडलेली असतें. बाहेरून आलेल्या ध्वनिलहरी आंतकर्णापर्यंत पोंहोचविण्याचें मुख्य काम मध्यकर्ण करितो. मध्यकर्णाचा पडदा ताणून बसविलेला असतो. खालच्या बाजूनें त्याला एक सूक्ष्म फट असते. फार जोराच्या लहरी आल्या तर हा पडदा फाटेल. म्हणून अशा वेळीं कांहीं लहरीं पडद्याच्या खालच्या बाजूनें आंत जातात व त्यामुळें पडद्यावरील आघात कमी स्वरूपाचा होतो.

मध्य कर्णाच्या पोकळीत घशाकडून आलेली एक नलिका असते. तिचा उपयोगहि मुख्यतः जोरानें आलेल्या ध्वनिलहरी घेऊन जाण्यासाठीं असतो. शिवाय ह्या नलिकेमुळें तोंडामधील हवेचा दाब बाहेरील हवेच्या दाबाबरोबर ठेवला जातो. कारण कान जर आंतून संपूर्ण बंद केला गेला तर बाहेरच्या हवेचा प्रचंड दाब कर्ण पडलावर पडेल व तो पडदा फाटून जाईल. कानाच्या पडद्यावर एकसारख्या मोठ्या आवाजाच्या ध्वनिलहरी येत असतील तर त्यांतल्या बऱ्याचश्या लहरीं ह्या नलिकेमार्फत घशांत आणून सोडल्या जातात. कांहीं वेळा कानांत दडे बसल्यासारखे होतात. पण घुटका गिळला म्हणजे घशाकडून जाणारी नलिका मोकळी होते व त्यामुळें स्वच्छ ऐकूं येऊं लागते. घशाकडून येणाऱ्या नलिकेला सूज आलीं तर कमी ऐकूं येते.

घशाकडून आलेल्या नलिकेमुळें एक गोष्ट लक्षांत येईल कीं, कानांत आलेल्या ध्वनिलहरीं तोंडांत येणे शक्य आहे. किंवा कदाचित "नळी फुंकिली......" प्रमाणे ध्वनिलहरी ह्या कानांतून त्या कानांतहि जात असतील. पण कोणी असं विनोदाने म्हणतात. कीं स्त्रियांच्या बाबतींत मात्र कानांतून आलेल्या ह्या ध्वनिलहरीं शब्दांच्या रुपानें मुखांतून बाहेर पडतात.

आंतरकर्णांत प्रत्यक्ष ऐकण्याची क्रिया केली जाते. त्या ठिकाणीं एक शंखकृति भाग आहे. हा भाग अगदीं अडणीवरल्या शंखाप्रमाणेच बसविलेला. तेव्हां प्रत्येक मनुष्य हा आंतून शंख असतो. शंखाकृति भागाच्या वेटोळ्यांत पोकळी आहे. आणि ह्या पोकळींत ध्वनिलहरीं ग्रहण करणाऱ्या पेशी आहेत. ह्या पेशींच्या ध्वनिग्रहणाबद्दल दोन मतें आहेंत. एका मताप्रमाणें सर्व पेशीं ध्वनिलहरीं ग्रहण करतात. तर दुसऱ्या मताप्रमाणें ठराविक पेशीं ठराविक प्रकारच्याच लहरीं ग्रहण करतात. दुसरें मत हें जास्त ग्राह्य मानलें जातें. प्रचंड आवाजाच्या कारखान्यांत काम करणाऱ्या लोकांना कांहीं दिवसांनी तेवढ्या आवाजाच्या ध्वनि लहरींचें ग्रहण करतां येत नाहीं असें दिसून आलें आहे. त्याची मीमांसा करतांना शास्त्रज्ञ म्हणतात कीं, एकाच प्रकारच्या ध्वनिलहरी एकसारख्या ग्रहण केल्यामुळें त्या विशिष्ट पेशींची ग्राहक शक्ति कमी होते. पहिल्या मताप्रमाणें सर्वच पेशीं जर ह्या ध्वनीलहरी ग्रहण करीत असल्या तर मग कानाची ऐकण्याची शक्तिच संपुष्टांत आलीं असती. परंतु असें होत नाहीं. आणि म्हणूनच दुसरें मत हें जास्त ग्राह्य समजले जातें.

शंखाकृति भागांतील पेशींकडून ग्रहण केलेल्या ध्वनिलहरीं कर्ण मज्जेमार्फत मेंदूकडे पाठविल्या जातात. डोळ्यांतील मज्जेप्रमाणेच येथेहि ध्वनिलहरींचें रुपांतर विद्युत्‌लहरींत केले जातें व मेंदूमधील श्रवण केंद्रांत, आपल्या घरांतील रेडिओप्रमाणें, त्या लहरींचें पुनर्रुपांतर ध्वनिलहरींत केलें जातें. म्हणजे मनुष्यानें रेडिओचा शोध लावण्यापूर्वी अनेक युगें निसर्गानें प्राण्यांत रेडिओ अगोदरच निर्माण केला होता.

आंतरकर्णांतील पेशींच्या कार्यक्षमतेवर आपली श्रवणशक्ति अवलंबून असतें. त्यामुळें प्रत्येक व्यक्तीच्या श्रवणशक्तींत फरक असतो. उदा० गाणें चालूं असताना किंवा वाद्यवादन होत असतांना कलावंत थोडासा जरी बेसूर झाला तरी ते ओळखण्याचें कौशल्य फारच थोड्या व्यक्तीमध्यें असतें. अशा व्यक्तींना संगीताचाकान (Musical Ear) आहे असें म्हणतात. एका विशिष्ट आंदोलनांच्या पलीकडे आंदोलित होणाऱ्या ध्वनिलहरीं इतर प्राणीं ऐकूं शकतात आणि म्हणूनच त्यांच्या आपल्यांत फरक दिसून येतो.

कानाचें काम फक्त ऐकण्याचें आहे असें मात्र समजू नका. कारण आंतरकर्णातील शंखाकृति भागावर एक फार नाजुक पण महत्त्वाचें इंद्रिय बसविलेलें आहे. आणि तें म्हणजें तोल संभाळण्याचें इंद्रिय. पण हा तोल फक्त शरीराराच आहे हं! ह्या इंद्रियात तीन अर्घ वर्तुलाकृति नलिका असतात. नलिकांमध्यें द्रव पदार्थ असतो व शिवाय मज्जापेशीं असतात. आपण जर उजवीकडे वाकलों तर दोन्हीं कानांतील अर्धवर्तुलाकृति नलिकांमधील द्रव डाव्या बाजूला जातें. तेथील पेशीं मेंदूकडे शरीराच्या स्थितीबद्दल बातमी पाठवितात. व लहान मेंदूमधील तोल केंद्राकडून शरीराच्या डाव्या बाजूकडील स्नायूंना आकुंचन पावण्याचा हुकुम सुटतो. त्यामुळें शरीर डावीकडे खेंचले जाऊन तोल संभाळला जातो.

ह्या मज्जापेशींना आपल्या पूर्ववत स्थितींत येण्यास कांहीं वेळ लागतो. त्यामुळें कांहीं वेळां मोठे गमतिदार प्रकार होतात. स्वतःभोवतीं चकरा घेऊन एकदम थांबल्यावर भोंवतालच्या वस्तू उलट्या बाजूनें फिरताना दिसतात. वास्तविक वस्तू आहेत त्या जागींच असतात पण आपल्याला मात्र त्या फिरताना दिसतात. असं कां होत ते पहा. गोल फिरावयास लागलों कीं अर्ध वर्तुलाकृति नलिकांमधील पेशींचें सूक्ष्म केसासारखे भाग त्या दिशेकडे होतात. आपण एकदम थांबलों कीं हे सूक्ष्म केस पूर्ववत स्थितींत येण्यासाठीं उलट्या बाजूकडें झुकतात आणि त्यामुळें मेंदूला तशी संवेदना दिली जाते. साहजिकच आपल्याला वाटतें की भोंवतालचें जग उलटें फिरत आहे.

कानशिलावर जबरदस्त तडाका बसल्यास आपला तोल जातो. कारण ह्या आघातामुळें तोलपेशींची बैठक बिघडते. व त्यामुळें तोल संभाळतां येत नाहीं. दारू प्यायलेल्या माणसाच्या लहान मेंदूकडें बाजवीपेक्षां जास्त रक्तस्राव जातो. त्याचा परिणाम त्या मेंदूमधील तोल केंद्राकडे आलेल्या संवेदनांची योग्य विल्हेवाट न लागल्यामुळें मनुष्याचा तोल सुटतो व मग कथाकली नृत्याचे कांहीं प्रकार आपल्याला दिसूं लागतात.

असा आपला हा कान ऐकण्याचं आणि तोल संभाळण्याचेंहि काम करीत असतो.

●●●





( पान ३७ वरून चालू )

माझ्या एकदां मनांत आलं कीं, आपण म्हणावं, "काय हो ! काय भानगड आहे ?" पण तें कसं बोलायचं हेंच मला कळेना. आणि मीही त्या मुलासारखा म्हाताऱ्याच्या तोंडाकडे पहात उभा राहिलों.

आणि मग जें घडणार म्हणून आम्ही दोघेही भीत होतों तेंच नेमकं घडलं.

त्या म्हाताऱ्यानं मान वर उचलली आणि त्याला तो मुलगा दिसला.

मला वाटतं तो आपल्या सहचरीला कांहींतरी बोलला. कारण ती आपली जागच्या जागींच स्तब्ध राहिली. आणि म्हातारा मात्र एकदम मुलाच्या अंगावर तुटून पडला. त्याक्षणीं तो भयंकर दिसत होता. त्यावेळचा त्याचा तो रुद्रावतार मी कधींच विसरणार नाहीं. त्याची ती नेहमी रुबाबदार आणि ऐटबाज वाटणारी चर्या त्याक्षणीं अगदीं संतप्त दिसत होती. आणि मुलांवर त्यानं शिव्याचा भडिमार केला. खरंच सांगतो, मी तें सारं ऐकलं.

छबडा बिचारा गोंधळला, बावरला आणि घाबरून लाचारीनें आश्रय शोधूं लागला. पण जवळपास आश्रयच नव्हता. जवळपास पाणगवत खूपसं होतं. तो बिचारा सरळ त्यांत घुसला. त्याला वाटलं आतां धोका नाहीं. मला तें करुण दृश्य बघवेना.

जरा धीर करून म्हाताऱ्याला अडवायचा माझा विचार होता. पण तो म्हातारा एकाएकीं परतला. आणि बडबडत शिव्या देत जाऊं लागला. छबडा लपलेल्या जागेवरून त्याच्याकडे पहात होता आणि मग तो हळूंच बाहेर आला आणि त्यानं कांहीं तरी वेत केला. मला वाटतं, घराकडे जाण्याचा त्याचा विचार होता.

मी आजूबाजूला पाहिलं. जवळपास चिटपांखरूंही नव्हतं. कोणाला मदतीची हांक मारणार. पलीकडच्या शेतावरून कुणाला बोलवावं म्हटलं तर त्या म्हाताऱ्याच्या भानगडींत पडूं नकोस असं पूर्वींच त्यांनीं मला बजावलेलं होतं. आणि शिवाय छबडाही कांहीं लहान नव्हता. आपली काळजी घेण्याइतका तो मोठा झालेला होता. पण अडचण इतकीच होती कीं मारामारी करण्याच्या वृत्तीचाच तो नव्हता.

मी त्या सरोवराच्या कांठाशीं बराच वेळ थांबलों पण मग कांहीं घडलंच नाहीं. हळूंहळूं अंधार पडूं लागला आणि मग तिथें थांबणं निरुपयोगीं होतं. तों म्हातारा आणि त्याची सहचरी केव्हांचीच घरीं परतली होती. मुलगा मात्र अजूनही त्या पाणगवताकडे रेंगाळत होता.

मी हळूंच त्याला हांक मारून म्हणालों—" कां उगाच रेंगाळतोस. तो तुला परत नाहीं घ्यायचा. जिथनं आलास त्या गांवीं परत जा. नाहींतर कुठें तरी दुसरीकडे जा. मात्र इथं राहूं नकोस."

त्यानं वर पाहिलं. त्याची ती कावरी बावरी नजर पाहिल्यावर माझी खात्री पटली कीं माझ्या बोलण्यांतलं त्याला एक अक्षर कळलं असेल तर शपथ !

त्याच्यापेक्षां अधिक कांहीं करणं माझ्या आंवाक्या बाहेरचं होतं. मी उठलों अन् घरीं गेलों. पण रात्र भर त्या मुलाचेच विचार माझ्या डोक्यांत घोळत होते. सकाळीं उठतांच मी पुन्हां सरोवरापाशीं आलों. येतांना एक काठी आणली. जरा धीर यावा म्हणून. काठीचा कांहीं विशेष उपयोग झाला असता असं नाहीं.

मात्र मौज अशी कीं रात्रीत कांहींतरी त्यांचा समझोता झाला असावा. कारण छबडा आईच्या बाजूला होता. आणि म्हातारा जरा पलीकडे होता.

मला कबूल करायला हवं कीं तें दृश्य पहातांच मला खूप हलकं वाटलं. नाहींतरी मी असा काय बोलूं शकणार होतो किंवा करूं शकणार होतों. कारण त्या म्हाताऱ्याला तो मुलगा घरीं नको असेल तर तो सर्वस्वी त्याचा प्रश्न होता. आणि तो खुळा मुलगा तिथंच रहाण्याचा मूर्खपणा करणार असला तर तो त्या मुलाचा प्रश्न होता. पण मी खरा दोष आईला देतो. तिनं त्या मुलाला सांगायला पाहिजे होतं किंवा त्या म्हाताऱ्याची समजूत काढायला हवी होती. पण तिला कुठलं तितकं डोकं असायला ?

कांहींहि असो त्यांच्यांत कांहींतरी तह झाला होता इतकं निश्चित. तो मुलगा आईच्या बाजूबाजूला असायचा. बहुधा घर कामांतही तिला तो मदत करीत असावा. आणि म्हातारा मात्र त्यांच्याशी जरा फटकून दूर असलेला आढळायचा.

पुढें पुढें तो अगदींच एकटा बसलेला दिसे. मला तें आवडलं नाहीं. आपल्याच विचारांत गुरफटल्यासारखा दिसायचा. त्याचे काय बेत चालायचे कुणास ठाऊक. पण कांहींतरी दुष्ट बेत

( पान ४३ वर पहा )

पा लु प द : २



## तुमचं मेलं आपलं कांहींतरीच

**'पालुपद' या अलंकाराचें आणखी एक उदाहरण**

हें या अलंकाराचें दुसरें उदाहरण आहे. वाचकहो, नीट विचार केलांत तर या वाक्यांतील चारहि शब्दांचा एकमेकांशीं कांहीं संबंध नाहीं हें तुमच्या लगेच लक्षांत येईल. या वाक्याला क्रियापद सुद्धां नाहीं. तुमचं मेलं. काय मेलं ? मांजराचं मेलं किंवा कुत्र्याचं मेलं तर ठीक आहे. काय मेलं असं विचारलं तर पिलूं मेलं असं म्हणतां येईल. पण तुमचं काय मेलं ? ठीक आहे. तुमचं मेलं आपलं. म्हणजे तुमचं मेलं कीं आपलं मेलं ? कीं आपल्या दोघांचेंहि मेलं ? आणि या सर्वांवर कडी म्हणजे शेवटीं 'कांहींतरीच'. या कांहींतरीच ला कांहीं तरी अर्थ आहे का ? सारांश या वाक्याला सुद्धां कांहीं अर्थ नसून पालुपद अलंकाराचें तें एक उदाहरण आहे.

चंद्रसेन



# ती काळरात्र आणि जन्माचें लांछन

मी आरडा ओरड करण्याचा प्रयत्न केला. पण त्यानें एक हातरुमाल माझ्या तोंडांत कोंबला आणि म्हणाला—' खबरदार, गडबड करशील तर "

त्यानें माझे हात पाठीमागें बांधले. मला पक्कं आठवतंय–त्यानें नंतर मला उचललें आणि बेडरूमकडे नेलें. माझा थरकांप झाला. काय होतंय हें मला कळत होतं. पण मस्तकावर कसलेतरी विलक्षण आघात होत होते. माझं सारं शरीर त्या पाशवी शक्तीपुढं लुलं पडलं. आणि त्यानें आपला कार्यक्रम उरकला. कसल्यातरी भयाण स्वप्नाची अखेर झाली होती. शेवटीं तो उठला--त्यानें आपले कपडे सांवरले–टेबलाचे खण धुंडाळूं लागला— "ते १५ पौंड घे आणि तोंड काळं कर." मी ओरडलें.

नेहमीसारखीच आजची रात्र ! माझे पति जो हे रोझ मेमोरियल हॉस्पीटलमध्यें हर्नियाच्या ऑपरेशन नंतर विश्रांति घेत होते. त्यांना भेटायला मी हॉस्पीटलमध्यें गेलें आणि ८॥ नंतर बसनें घरीं आलें. घरीं आलें आणि कोचावर थोडावेळ बसलें. मनाशीं विचार आला अनिता आमची दोन वर्षांची मुलगी ह्यांच्या मित्राच्या घरीं चार दिवस राहायला कबूल झाली म्हणून किती चांगलं झालं ! असा विचार करीत असतां सहज समोरचा पेपर घेतला आणि चाळायला सुरवात केली. इतक्यांत बाहेर कुणाचीं तरी पावलं वाजलीं, दरवाजा उघडला आणि सहा फूट उंचीचा एक आडदांड माणूस आंत आला. माझं काळीज चर्र झालं. मघाशीं येतांना मी दरवाजा नीट लावला नव्हता याची मला आठवण झाली. मी विचारालं—"काय पाहिजे तुम्हाला ? "

"मला जरा फोन करायचाय ! " तो म्हणाला.

त्यावर मी कांहीं बोलायच्या आंतच तो सरळ टेलीफोनजवळ गेला आणि नंबर फिरवूं लागला. त्याच्यापासून दूर जावं म्हणून मी उठलें इतक्यांत तो उठला आणि त्यानें माझा गळा धरला आणि गडबड केलीस तर ठार मारीन अशी त्यानें धमकी दिली.

त्यानें मला धरलें आणि तो कपाट धुंडाळूं लागला. तेथचं एक रिस्टवॉच त्यानें खिशांत टाकलें, " बाकीचे पैसे कुठे आहेत–" त्यानें विचारलें. मी माझी पर्स त्याच्यासमोर भिरकावली. त्यांतले

१७ सप्टेंबर १९५५ रोजीं अमेरिकेंतील डेनव्हेर (कोलॅरॅडो) येथील २७ वर्षे वयाच्या एका विवाहित तरुणीवर अमानुष बलात्कार झाला. तेथील वृत्तपत्रांत त्या तरुण मातेचं नांव गुप्त ठेवण्यांत आलं.

—त्यानंतर एका वर्षानें त्याच स्त्रीनें त्या भयंकर काळरात्रीं काय घडलें याची कहाणी स्वतः निवेदन केली.—बलात्कारामुळें मिसेस मार्गी ॲन्सन ही गर्भवती झाली आणि त्यामुळें त्या काळरात्रींचं हें शल्य कायम राहिलें—तिची ही कहाणी.

---

अगळे पैसे त्यानें खिशांत टाकले आणि नंतर मला उचललं आणि बेडरुमकडे घेऊन गेला, आणि सर्व दिवे मालवून टाकले.

अंगांत असेल नसेल तेवढें बळ खर्च करून मी हात पाय, झाडले, तोंडांतला बोळा काढून टाकण्याचा प्रयत्न केला. पण त्या आडदांड राक्षसापुढें माझा काय टिकाव लागणार!

अखेर सारं कांहीं संपल्यावर तो स्वैंपाक घरांत गेला. जातांना मला म्हणाला—"खबरदार जागची हललीस तर, नाहींतर ठार मारीन!" मला वाटलं आतां पाव कापायची सुरी आणून मला तो ठार मारणार! त्यावेळीं तरी त्यानें मला मारून टाकावं असंच मला वाटलं. आंत जाऊन तो सोडा प्यायला आणि बाहेर येऊन म्हणाला—"मी आतां थोडा वेळ व्हरांड्यांत थांबतो. जर कां कांहीं कुणाला कळवलंस तर परत आंत येईन—मग पस्तावशील"

तो गेल्यावर मी मोठ्या कष्टानें दरवाजा उघडला—कारण माझे हात पाठीमागें बांधलेलेच होते—आणि शेजाऱ्याकडे धांवले. त्यांनी माझे हात सोडले आणि सारे जण त्याच्या तपासासाठीं धांवले. पण तो केव्हांच पसार झाला होता.

पोलीस आल्यावर त्यानीं मला लगेच हॉपिटलमध्यें उपचारासाठीं नेलें. मी सर्व हकीकत सांगितली. तेवढ्यांत त्यांनीं माझ्या पतींना फोन केला. हॉस्पीटलमधील डॉक्टरनें मला तपासलें आणि माझ्यावर बलात्कार झाला असा निर्णय दिला. मी त्याला विचारलें—"मी जर कां गरोदर राहिलें तर?" डॉक्टर म्हणाले "असा संभव फार कमी—" दुसरे दिवशीं मी आमच्या फॅमिली डॉक्टरकडे गेलें. त्यांनीं मला सांसर्गिक रोगापासून सावधगिरी म्हणून पेनीसिलीनचें एक इंजेक्शन दिलें. सकाळीं मी जोला भेटायला इस्पीतळांत गेलें, त्यानें मला विचारलें "त्या इसमाला पूर्वी तूं कधीं पाहिलें होतेस काय? त्यानें तुझा बसमधून पाठलाग केला काय? तूं एकटीच आहेस हें त्याला कसें कळलें?!"

बलात्काराच्या गोष्टी आपण वर्तमानपत्रांतून वाचतो पण असा प्रसंग आपल्यावर येईल अशी मला कल्पनाहि नव्हती. नेब्रास्का येथील एका शेतकरी कुटुंबांत माझा जन्म झाला. माझ्यापेक्षां मोठी अशीं सहा भावंडे. मी सातवी आणि माझ्या पाठीमागें आणखी एक. सहा वर्षांपूर्वी मी डेनव्हेर येथें आलें. तेथें एका रेस्टोरॅमध्यें नोकरी धरली. तेथेंच जो ची माझी भेट झाली. त्याचं आज वय ३७ आणि माझं २७ वर्षें. गेलीं तीन वर्षें आम्हीं याच जागेंत राहात आहोंत. सारं कांहीं मजेंत चाललं होतं—

बलात्काराचा प्रसंग मी पुष्कळ विसरून जाण्याचा प्रयत्न करीत होते पण भवितव्य यापेक्षांहि निर्दय होतं. एक दिवस आमच्या फॅमिली डॉक्टरनें मला सांगितलें की मी गरोदर आहे.

तें ऐकून मला भोंवळच आली. अशा भयानक प्रसंगांतून जन्माला येणाऱ्या आणि ज्याचा जनक कोणी तरी विषयांध आडदांड अशा मुलावर मी कसं प्रेम करूं?

डॉक्टर म्हणाले कीं कदाचित् अशा परिस्थितींत गर्भपात कायदेशीर ठरत असण्याचा संभव आहे.

मध्यंतरांत त्या रानटी पशूला दुसऱ्या एका बाईवर बलात्कार करण्याच्या आरोपावरून पकडण्यांत आलें. पोलिसांनीं ओळख परेड घेतली आणि मला बोलावलं. मी तात्काळ त्याला ओळखलें. अठरा वर्षे वयाच्या जॉन पीटर्सनें कबूली दिली कीं आरण हिच्यावरच काय पण आणखी तीन स्त्रियांवर बलात्कार केले.





२७ वयाची (दुर्दैवी) मिसेस मार्गी ॲन्सन आणि... तिच्या दुर्दैवाचें मूळ—१८ वर्षांचा जॉन पिटर्स.



## तुझें तुला नकळत

भीडखुळ्या अबोलिला
आजच सुचली बोली
लाजरिच्या फुलकळीस
लाजहि आजच आली

रोजची ग चाल तुझी
तालच आज विसरली
जाणिवेंत तव लकेर
नवी अखेर मिसळली

डोळ्याच्या पापणिची
कड थोडी जड झाली
नजरेसहि गिरकीची
भिरभिरती तड गेली

मिटलेल्या शब्दांनीं
उघडियले ओंठ जरा
शिवलेल्या अर्थाची
विस्कटली गोठ जरा

झुळुक आज चुळुकभर
प्याली हळुच गारवा
कण ओला मातीचा
अंकुर ये वर हिरवा

शैशव तव आज सरे
साज नव्याचा उमदा
तुझें तुला नकळत ग
वर्ष संपलें चौदा!

—रॉक कार्व्हालो

---

पण माझा गर्भपात कायदेशीर होऊं शकत नाहीं असा निर्णय डिस्ट्रिक्ट अॅटर्नीनें दिला. 'कोलार्डोच्या कायद्याप्रमाणें एक गुन्हा छपविण्यासाठीं दुसऱ्या गुन्ह्यावर पांघरूण घालतां येत नाहीं, असें त्यांचें मत. त्यानंतर तो काय म्हणाला हें मला आठवत नाहीं. मी अगदीं सुन्न झालें होतें. मात्र घरीं परततांना माझ्या मनाशीं एकच विचार आला कीं आपण त्याला असं विचारायला हवं होतं—कीं माझ्या जागीं तुझी बायको किंवा बहीण असती तर तूं काय केलं असतंस ?"

घरीं मी धांवतच आलें आणि आमच्या डॉक्टरना फोन केला. "डॉक्टर यांतून तुम्हींच कांहींतरी मार्ग काढला पाहिजे."

एका पशूचं बीज आपण आपल्या पोटांत वाढवतों आहे ही कल्पनाच मला सहन करवेना. एक अनौरस बालक माझ्या घरांत वाढविणं कसं शक्य होतं ?

सगळा कायदा आणि सर्व राज्यांचे कायदे आम्हीं तपासले. पण कुठंच ही सवलत नव्हती. मला अक्षरशः वेड लागायची पाळी आली. प्रत्यक्ष मूल जन्माला येईल तेव्हां माझी काय अवस्था होईल याची कल्पनाच करवेना.

दिवसामागून दिवस लोटले. शेवटीं डॉक्टर म्हणाले कीं गर्भपात करणहि धोक्याचं आहे.

हें सगळं सांगितलं म्हणून तुम्हीं मला दोष नाहीं ना देणार ? पूर्वी माझी तरी अशी समजूत होती कीं गुन्हा घडला कीं ज्याचं नुकसान झालंय अशा व्यक्तीला मदत करण्यासाठीं कायदा नेहमींच धांवून येत असावा. पण आज मात्र त्यांतील वैयर्थ मला कळलं. माझ्या मदतीला कुणीहि येईना !

शेवटीं अगतिक होऊन मी 'डेनव्हेर पोस्ट' या वृत्तपत्राची स्त्री बातमीदार जेन स्टार्लिंग हिची भेट घेतली. अशा प्रकारच्या भयाण प्रसंगापासून स्त्रियांनीं सावध कसं राहावं याचा इशारा द्यायची माझी इच्छा होती. आजहि डेनव्हेरच्या रस्त्यांतून कामपिडित लिंगविकृत गुंड हिंडत असतील—अशा गुंडापासून आम्ही भयानें आणि शरमेनें मागें न सरतां त्यांना चांगलाच धडा शिकवावा म्हणून माझी कहाणी जनतेसमोर ठेवण्याचा मी निर्धार केला. जेननें माझं पत्र प्रसिद्ध केलं. मात्र संपादकांनीं माझं नांव गुप्त ठेवलं होतं. मला संपादकांच्या पत्त्यावर एकूण २०० पत्रें आली. त्यांतील सात स्त्रिया गुंडांच्या बलात्कारामुळें गरोदर राहिल्या होत्या. त्यांतील बहुसंख्य कुमारिका त्या. सर्वांनीं माझ्याबद्दल सहानुभूति व्यक्त केली तर अनेकांनीं अशा व्यक्तींना कायद्याचें संरक्षण देण्यासाठीं कायद्यांत बदल करावे अशीहि सूचना केली होती.

१५ जानेवारी १९५६ ला पीटर्सला जन्मठेपेची शिक्षा झाली. आपण याशिवाय एक ५२ आणि दुसरी २८ वर्षांची अशा आणखी दोन स्त्रियांवर बलात्कार केला याचीहि त्यानें कबूली दिली.

माझं मूल मी अनाथाश्रमांत ठेवणार आहे. पण ही कहाणी इतक्या विस्तारानें सांगण्याची गरज अशासाठीं कीं स्त्रियांच्या शील रक्षणाची समाजानें हेळसांड करूं नये. पीटर्स रुंगांत गेलाय आणि यापुढें तो कुणालाहि अपाय करणार नाहीं ही समाधानाची गोष्ट. पण सर्वांनीं एकच गोष्ट ध्यानीं घ्यावी कीं मलाहि त्यादिवसापर्यंत असं वाटत होतं कीं, छे! असा प्रसंग आपल्यावर स्वप्नांतहि येणार नाहीं.

अनुक्रमणिका








( पान ३९ वरून चालू )

चालत असावेत. कांहीं काळापूर्वी गुण्यागोविंदानं एकत्र फिरणारं तें कुटुंब, तिच्या बरोबरीनें तो चाललेला मला आठवतोच. आणि आतां थंडी वाऱ्यांत एकटाच उदासवाणा तो बसत असे आणि आई आणि लेक जोडीनें फिरत असत.

मला खूप वाईट वाटलं. आणि भीति पण वाटली. कारण असंच फार काळ चालेल असं मला वाटत नव्हतं. कांहींतरी घडणार इतकं निश्चित.

आणि एक दिवस मी असाच किनाऱ्यावर भटकत असतांना मी सहज त्या म्हाताऱ्याच्या घराकडे नजर वळवली. मला तो मुलगा आईजवळ दिसला नाहीं. म्हणून मी आजूबाजूला पाहिलं तर तो मागें एकदां लपला होता त्या पाणगवतांत होता. त्याच्या बापाइतकाच तो मोठा दिसत होता. पण भीतीनं कापत होता. आपली ताकत वापरायची त्याला अक्कल नव्हती. आणि तो म्हातारा त्याच्याकडे संतापानं पहात होता. त्याच्या डोळ्यांत खून चढलेला होता.

मी स्वतःशीच म्हणालों--" हा बहुधा याचा मुडदा पाडणार ! ", पण केव्हां आणि कसा तें मला कळेना. रात्रीं तो निजला असतांना कीं मासे मारायला गेला असतांना, तें मला समजेना. आई त्याबाबतींत निरुपयोगी होती. तिला कांहीं तें अडवतां आलं नसतं. तेव्हां तिला सांगाण्यांत कांहीं अर्थ नव्हता. त्या मुलानंच डोकं वापरून तोतिथनं निघून गेला असता तरच......

आणि रात्र झाली. रात्रीं सपाटुन पाऊस पडला. आणि मग दुसऱ्या दिवशीं दुपारपर्यंत सरोवराकडे जाणं मला कांहीं जमलं नाहीं. दुपार उलटत होती मी गेलो तेव्हां.

तो म्हातारा आणि ती दोघेही मला दिसले. अगदीं शेजारी शेजारी उभे होते ते. त्यांनीं मला येतांना पाहिलं असावं कारण ते मान उंचावून पहात होते. पण मुलगा तिथं नव्हता आसपासही कुठं नव्हता.

माझ्या मनांत चर्रर झालं. मी झपाट्यानं पुढें मागे शोधला आणि हा सारा वेळ म्हातारा माझ्यावर नजर रोखून आहे याची मला जाणीव होत होती,

आणि मग मला तो मुलगा अकस्मात दिसला. मी धांवत त्याच्याजवळ गेलों. पाणगवताच्या दुसऱ्या एका पुंजक्या आड तो पडलेला होता.

त्याचे प्राण केव्हांच निघून गेले होते. त्याच्या अंगावर रक्त सुकलेलं होतं. रात्रभर तो तिथंच पडलेला असावा पावसानं त्याचा मृत देह झोडपल्यासारखा दिसत होता.

तुम्ही मला खुळा म्हणाल कदाचित, पण मी एकदम रडूं लागलों त्या म्हाताऱ्याकडे पाहून ओरडलों--" खूनी दुष्ट, नराधम " पण त्यानें कांहींच जबाब दिला नाहीं. तो जाग्यावरून हललाही नाहीं. तसाच आपल्या सहचरी जवळ उभा राहून माझ्याकडे पहात राहिला.

मग मी काय केलं तें तुम्हांला विचारायचं असेल नाहीं ? मी घरीं जाऊन एक फावडं घेऊन आलों. मी त्या मुलासाठीं एक खड्डा खणला. त्याचा धर्म कोणता हें नक्की ठाऊक नसल्यामुळें माझ्या धर्मांतलीच एक प्रार्थना मी म्हटली. आणि हळूवार हातानं त्याचं दफन केलं. सारी क्रिया आटोपतांच मी पलीकडल्या त्या म्हाताऱ्याकडे पाहिलं.

आणि मला काय दिसलं ठाऊक आहे ?

त्यानं आपलं डोकं खालीं घातलं आणि तिच्याजवळ येऊन गळ्यांतगळा घातला. तिनंहि त्याच्या गळ्यांतगळा घातला. बहुधा दोघांनांही पश्चात्ताप झाला असावा. पापाचं प्रायश्चित घ्यावं असं वाटत असावं. त्यांना जाणीव झालेली असावी कीं त्यांच्याकडून एक महा पातक घडलेलं आहे. पण आतां त्याची निशाणी नव्हती. कारण मी त्याचं दफन केलं होतं. आतां त्याचा मागमूसही नव्हता. ते दोघेही संपूर्णपणें मोकळे झाले होते. त्या दोघांना एकमेकांपासून दूर लोटणारा तिसरा केव्हांच नाहींसा झाला होता.

आणि मग ते दोघेही झपाट्यानं सरोवराच्या मध्यभागीं आले त्या म्हाताऱ्यानं आपली डौलदार लांब मान वर उचलली छानदार पंख एकदोनदां जोरानें हलविले आणि पाण्यावरून वर झटकन् उडी घेतली. पाठोपाठ तीही वर उडाली.

सूर्य मावळतीला चालला होता. क्षितिजावर सोनेरी रंग उधळलेला होता आणि त्या पार्श्वभूमीवर ती राजहंसांची जोडी झपाट्यानें उडत होती. तें दृश्य मोठं अवर्णनीय होतं. सर्वत्र पसरलेला तो तांबूस सोनेरी रंग आणि झपाट्यानें लहान होत चाललेली उडणारी ती राजहंसांची एकमेव जोडी !

( अनुवादित )

• • •








( पान ७ वरून चालू )

पृथुजघना रतिमंदिर सुंदर सुवर्णमदनासन तें
नेसविवसना मणिमयरशना तोरण कटिबंधातें
विपुलधन गौरवि उत्संग
कामिनिकोमल पदकमलातें लावित कमलानिलया
हृदयावरि रतनार पाडलें नखमणि चेतवि प्रणया
वांछिते-प्रीतिसुखसंग
किती ग फसवा कपटसिंधु तो बंधू बलरामाचा
विरस करी माझिया मनाचा, विसर पडे वचनाचा
गोपिका रतिरंगीं दंग
कशास राहूं उदासवाणी एकलीच या विपिनीं
कपट नटवरा आठवीत मी फसुनी लटक्या वचनीं
निर्दय करी मनोभंग
श्रीहरिचरिता मधुरसनिर्झर कवनीं या नित सेवा
कलिमलहरणा दुरितनिवारी चरणीं रत जयदेवा

**प्रबंध १५ समाप्त**

अति कठिण हृदय ग हरिचें
केलिस किती विनवणी तरी ना
पाझरते मन त्याचें ॥
अगणित युवती रसिक गुणवती
उन्मादिनि रतिरंगीं रमती
कृष्णभृंग हा फुलाफुलांसह खेळ करी नवलाचे
किति कठिण हृदय ग हरिचें
नाही तुझा अपराध सखे ग
भोग कपाळीं चुकेल का ग ?
आकर्षण हें नवनवतींच्या नाजुक सौंदर्याचे ॥किति॥
सखये परि माझी उत्कंठा
भेटवील मजसी वैकुंठा
फिटेल बाई कधीतरी ग पारणेंच विरहाचें ॥ किति ॥

\+ \+ \+

**प्रबंध १६ वा**—( राग-देश, रुपकताल )

रमता रतिरंगी हृषिकेशी
छळ सुखद होति रमणीसी
वायुविकंपित नयन थरकती
शयनी निजता तनु लुसलुसती
भीतिही थिट्ठकली होय कशी
अधरसुधा पिउनी नवतरणी
लाडिक कुजबुज मंजुल वचनी
शरमेचक हो सुखशेज जशी
कुंजकमल ते विकसित होई
हृदयभेद साधेन स्मरा ही
मलयानिल ज्वाळिल काय कशी ?
कवळित कंजचरण करकमळी
चंदकिरण नच येती जवळी
बाधे न शीत घेतांच कुशी ॥ छळ ॥

मेघापरि घननीळ उन्मनी
कामिनी ती घाल्वी यामिनी
विरहदाह नच हो तिजसी ॥ छळ ॥
सोनसळी ती वसन झळाळी
गुपित कळवि रंगलि रसव्राळी
परि जन हसतां मोद तिशी ॥ छळ ॥
शामसुलोचन त्रिभुवनसुंदर
करि रतिलीला मदनमनोहर
वेदनेंत आनंद निशी ॥ छळ ॥
श्री जयदेव वदे हीं वचनें
वसो हृदयसदनीं हरिभजनें
विरहाकुल वृत्ती होय कशी ॥ छळ ॥

**प्रबंध १६ समाप्त.**

मलयागिरि चंदनावरुनिया सुदूर दक्षिणदेशीं
प्रसन्नपावन परिमळ पसरित वाहत पवनां येशी
मदनातें अनुकूल होऊनी झालासी मज वैरी
दया एकदां करी रे तरी भेटवि शाम मुरारी
जिवलग माझा मला पाहुं दे निश्चल डोळे भरूनी
खुशाल घेई प्राण सख्या रे प्राणसखा दावोनी

\+ \+ \+

मन घेत धांव तुजकडेच शाममुरारी
हे मुकुंद माधव शौरी
आसमंत विपिनीं वसंत सारे कसे जाहले वैरी
हे मुकुंद माधव शौरी
सखि परिजन मधुकुंजवन तसे
अनिल अनलसम जाळित भासे
झोंबति अंगा नागिणीपरी चंद्रकिरण अति जहरी
हे मुकुंद माधव शौरी
आवरितां आवरे न बाई
आठविता कपटी चतुराई
आशांची उच्छृंखल घाई, काम कुपित मन लहरी
हे मुकुंद माधव शौरी
प्राणविहग तुजविण तळमळतो
उरीं लागता शर कळवळतो
कठिण हृदयि हा मन्मथ छळतो, आणि जिवाला घेरी
हे मुकुंद माधव शौरी

* * *

छळि रे सुखें मलयानिला करि वेदना मदना मला
गृह तें नको बघणें पुन्हां सुटका न हो मरणाविना
घे प्राण ग शमनस्वसें यमुनें जळीं बुडवी मला

* * *

आनंदें सुरवृंद लोळतो तुझिया चरणांवरी
नीलमणी मुकुटांत शोभती मिलिंद इंदीवरीं
मरंद सुंदर मंदाकिनि ती स्वच्छंदें वाहते
पदारविंदा तुझ्या मुकुंदा वंदित वंदारुतें

**'नागर नारायण' सर्ग ७ वा समाप्त**

अनुक्रमणिका






*‘ जणुं सामवेद पूर्णावतार धारण करून आमच्यासमोर उभा होता. ’ सुरश्री केशरबाईंच्या सहवासांत अनुभवलेले*



गोपाळकृष्ण भोबे

केसरबाईंचें गाणें ऐकावें असें कित्येक दिवस मनांत होतें; पण योग जुळून येत नव्हता. थोर गवय्या म्हणून नांव लौकिक कमावल्यानंतर देखील भास्करबुवांनी ज्यांचें शिष्यत्व पत्करलें, त्या मरहूम खाँसाहेब अल्लादिया खाँ कडून जिला दुर्मीळ अशी नायकी मिळाली व जिचें नांव घेतांच गाणें जाणणारे लोक नम्र होत त्या बाईंचें गाणें मी अजून ऐकलें नव्हतें.

कुणीहि अजाण माणसानें कौतुक करावें एवढें गाणें बरोबर घेऊन मी मुंबईत आलों. मुंबईत येऊन चार वर्षें झालीं होतीं. गाण्याचा थोडासा अभ्यास आणि गाणें समजणाऱ्या लोकांचा सहवास, यामुळें ‘ आपल्याला कांहीं तरी येतें ’ असा बराच ( गैर ) समज मीं करून घेतला होता. आतांपर्यंत मीं पुष्कळ गाणीं ऐकलीं होती. इकडूनतिकडून गोळा केलेले पांच सहा तानपल्टे व चीजा माझ्या संग्रहीं होत्या. ( पुष्कळ ताना मारणें म्हणजेच गाणें असाहि माझा समज होता ) जें नवीन ऐकलें त्याचें ताबडतोब अनुकरण करून मित्रमंडळींत वाहवा मिळवणें यांतच धन्यता वाटत होती. यमन, भूप, भीमपलास, बागेश्री इत्यादि प्रचारांतल्या रागांची किंचित् छटा गळ्यांतल्या फिरक्या तानेंत येत असल्यानें, उगीचच स्वतःबद्दल कांहीं तरी वाटत होतें. अभिमान उत्पन्न झाला होता.

आणि एक दिवस लक्ष्मी बागेंत केशरबाईंचें गाणें असल्याची बातमी मला मिळाली; परंतु एका अनोळखी संस्थेतर्फें तें असल्यानें प्रवेश मिळेल न मिळेल या भीतीनें मीं आधीं श्री. रत्नकांत रामनाथकरांना गांठून प्रवेश सुलभ करून घेतला. आजपर्यंत नुसती कीर्ति ऐकत असलेल्या या बाईंच्या एकदोन ताना आपल्या संग्रहीं आणतां आल्यास पाहाव्या ( त्यांत काय विशेष ! ) ही वृत्ति मुळाशीं धरून, रामनाथकरांच्या बरोबर मीं हॉलमध्यें घुसलों. माझे परिचित असे तरुण गायक आधींपासून जवळची जागा धरून बसले होते. एरवीं क्वचितच दिसणारा गिरगांवदादर विभागांतला प्रतिष्ठित समाज आपल्या राखीव खुर्च्यांवर बसला होता. ज्यांच्या तपश्चर्येच्या तेजोवलयाकडे सगळे लोक वारंवार पाहात होते ते खाँसाहेब विलायतखाँ, गोविंदराव टेंबे आदि विद्वान लोक सन्माननीय पाहुण्यांच्या रांगेंत बसले होते, कसाबसा मीं पुढें गेलों आणि त्या दाटीवाटींत मलाहि खुपसून घेतलें.

बाई हॉलमध्यें आल्या. गच्च भरलेल्या श्रोत्यांच्या हृदयाचा ठाव घेणारा त्यांचा एक दृष्टिक्षेप हॉलभर फिरला. विद्वान पाहुण्यांना त्यांनीं नमस्कार केला. श्रोत्यांनांहिं केला. आणि त्या व्यासपिठावर बसल्या. मला उगीचच थरथरल्यासारखें झालें. तसा रत्नकांत रामनाथकर कुणाला मानणार नाहीं. त्याच्या संगीताचा व्यासंगहि तसाच जबरदस्त. आपलें सारें आयुष्य त्यानें गाण्याला वाहिलेलें; परंतु चटकन् अदबीनें पुढें होऊन बाईंचा तानपुरा घेऊन तो जुळवून देतांना जेव्हां मीं त्याला पाहिलें, तेव्हांच माझ्या सुप्त अभिमानाला जोरदार तडा गेला.

विष्णु शिरोडकरानीं तबला स्वराशीं जुळवून घेतला. मजिदखाँसाहेबांची सारंगीहि जुळवून झाली, सारा साज एकजीव झाला, आणि त्या स्वरांत बाईंनी आपला ‘ आ ’ कार मिसळून घेतला. केव्हढा तो ‘ आ ’ कार ! जितका लांब तितका रुंद, तितकाच खोल. मंद्र सप्तकांतल्या धैवतानें नम्रपणें अभिवादन केलें. पंचमानेंहि तीच तत्परता दाखविली आणि ऋषभाच्या गालावर सहज टिचकी मारून, बाईंनीं ‘ अब मानले ’ या चीजेच्या पांचच, अक्षरानीं ‘भूप’ उभा केला.

त्या ‘ भूपाला ’ उभे करण्यांत जरब होती, हुकुमत होती. अधिकार होता. तेवढेंच प्रेमहि होतें. नुसतेंच गोंजारणें नव्हतें, आस्था होती. अस्ताई वळसा घेऊन समेवर आली तीच मुळीं सर्व सभेचा जोरदार होकार घेऊन आणि त्या पहिल्याच होकाराबरोबरच मानेला झटका बसून, माझा गाण्याच्या कल्पनेबद्दलचा सारा अभिमान लक्ष्मीबागेच्या त्या फरशीवर आदळला. मुग्ध होऊन मीं ऐकत होतों. बाजूला बसलेल्या त्या विद्वद्वर्यांकडे पाहात होतो. डाव्या उजव्या बाजूला त्यांची मान साक्षी हालत होती. एक एक तान, एक एक पल्टा लखलखीत रूप घेऊन येई. चमकणाऱ्या विजेसारखा. चांचरणें

नाही, खटकणें नाहीं, चोराचोरी नाहीं, कीं बनावटपणा नाहीं. सगळें कांहीं शुद्ध, धुतल्या चांदण्यासारखें! भूप संपला तेव्हां मीं बाजूला पाहिलें. रत्नकांताच्या डोळ्यांत पाणी उभे राहिले होते. जवळच बसलेल्या गुरुबंधु सीतारामला तो म्हणत होता. "माझ्या आयुष्यांतलीं कांहीं वर्षं हिला मिळूं देत. आणि हें गाणें असंच चिरंजीव राहूं दे!"

माझी मात्र अगदींच केविलवाणीं अवस्था झाली. एक दोन ताना संग्रहीं करण्याकरितां म्हणून मीं गाणें ऐकायला आलों; परंतु त्या लखलखाटांत इतका दिपून गेलों, कीं मजजवळच्या मुळांतल्या तानाच विसरलों. मनांतल्या मनांत मीं नमस्कार केला. आणि वाटलें, 'गाणें हें कांहीं आपलें काम नव्हें!' त्यांतल्यात्यांत एक समाधान होतें, तें म्हणजे बाईंनीं गायलेला राग मला समजला होता. निदान समंजस श्रोत्यांत स्वतःलाच कांहीं तरी समजून बसायला हरकत नव्हती; परंतु याहि सुप्त अहंकाराच्या चिंधड्या उडाल्या. बाईंनी गायलेल्या नंतरच्या कुठल्याहि रागाची ओखळ—नखें दुखेंपर्यंत डोकें खाजवूनहि—मला पटलीच नाहीं. घरीं परततांना फक्त 'नट बिहाग, पटबिहाग, रायसा कानडा' असलीं श्रोत्यांनी उच्चारलेलीं 'अनवट' नांवें तेवढीं कानावर आदळत होतीं.

यानंतरच्या काळांत केशरबाईंच्या आणखी तीन चार बैठकी मीं ऐकल्या. पण दर खेपेला हीच परिस्थिति होई. सबंध बैठकींतला प्रचारांतला असा एखादाच राग मला ओळखतां येई. बाकी गाणें प्रश्नचिन्हांकित चेहरा ठेवून मीं ऐकत असें; "काष्ट्याच्या आणि-वर वसले तीन गांव" या भारुडाचा अर्थ लावायचा प्रयत्न मीं समजायला लागल्या-पासून करवों आहे. पण ह्या वेळपर्यंत जसा तो आकळलाच नाहीं, तद्वत् केशरबाईंचें गाणें अजूनहीं मला कळलें नाहीं. परवां मर्चंट चेंबर्स हॉलमध्यें त्याचा पूरा प्रत्यय आला.

सूरसिंगारतर्फे झालेल्या त्या कार्यक्रमांत 'म्यूझिक क्रीटिक' म्हणून मीं समोरच बसलों होतों (बाईंना या गोष्टीची जाणीव नसावी!). एका 'ललिता गौरीची तेवढी ओळख पटली; परंतु पुढें, मल्हारांतला एखादा प्रकार. नटांतला एखादा प्रकार अशी स्वतःची समजूत करून घेण्याखेरीज गत्यंतर राहिलें नाहीं. ज्यासाठीं त्यानी देहाचे रक्त आटवले, त्यासाठीं आम्हांला घामहि गाळावा लागूं नये (एअर कंडिशन्ड हॉलमध्यें हल्लीं तोहि येत नाहीं.) मग ओळख कुठली पटणार? या जन्मीं तरी तें शक्य नाहीं. म्हणूनच केव्हां केव्हां बाईंचा अहंकार मला सार्थ वाटतो. आणि साम्राज्ञी-जवळ अहंकार नसावा तर मग तो आणखी कुणाजवळ असावा?

केशरबाईंची भेट घेण्यासाठीं माझें मन खूप तळमळत होतें; पण धजत नव्हतें. अपमान होईल या भीतीनें नव्हें, तर तसा आत्मविश्वास नव्हता म्हणून. एकदां मीं दादरला त्यांच्या घरापर्यंत गेलों सुद्धां; पण 'हें कार्य नव्हे तुजजोगें' हा मध्वमुनीश्वरांनी समजाविलेला पोक्त विचार करून परत आलों. केशरबाईंनां एकदां भेटायचें आहे, असा मंत्र त्यांच्या निकटवर्तियांजवळ मात्र मीं अनेक वेळां घोकला होता. आणि एक दिवस अचानक मला निरोप आला 'बाईंनीं तुम्हांला बोलावलें आहे.'

'घरीं' आलेल्या पाहुण्याजवळ संगीताची चर्चा वा संगीतासंबंधीं कसलींच अवांतर बोलणीं केशरबाई कधींहि करीत नाहीं. तो विषय देखील काढलेला त्यांना आवडत नाहीं. नसते प्रश्न विचारले तर बाई तिथल्या तिथें निरुत्तर करतील?' आदि खूप गोष्टी मी ऐकल्या होत्या. निरोप घेऊन आलेला मनुष्य माझा स्नेही होता. त्याच्याशीं चौकशी केली. या गोष्टींना त्यांनीं पुष्टीच दिली होती; परंतु 'गाण्यावर बोलायचें नाहीं, तर नुसत्या शिळोप्याच्या गप्पांना मीं जाऊं तरी कशाला?' असा प्रश्न ओठावर आला होता; पण तो मीं गिळून टाकला होता. आधीं जाऊन तरी पाहूं! मग काय परिस्थिति येईल त्याला तोंड द्यावें. असें मनाशीं ठरवून 'तुका म्हणे येथें भजन प्रमाण' हा चरण घोकीत मीं वेळ विचारून घेतली, आणि होकार दिला—

आणि एका भल्या रविवारीं सांगितलेल्या वेळेप्रमाणें बरोबर ५ वाजतां आम्ही केशर-बाईंच्या निवासस्थानाच्या दरवाज्यावरची बेल वाजविली. माझ्या बरोबर श्री. सीताराम फातर्पेकर, श्री. विष्णु शिरोडकर व मनोहर शिरोडकर असे आम्हीं चौघेजण होतों.

"यॉ, हांवें म्हळें कोण येता कोण जाणा!" दार उघडतां उघडतां माझ्याकडे एकदां आपादमस्तक पाहून बाईंनीं एका अर्थी मला माझी जाणीव करून दिली होती. पण मी वरमलों नाहीं. हॉलमध्यें माझी नजर ठिकठिकाणीं स्थिरावत होती. गुरुजनांची चित्रें कृतकृत्य झाल्याच्या आनंदानें फुललीं होती. कवींद्र रवींद्रानी स्वहस्तानें लिहिलेलें गौरवपत्र चांदीच्या चौकटींतून सांगत होतें., 'तेवढी तपस्या असल्याखेरीज का रे मी इथें आले?" भिंतीवर टांगलेलीं मोठमोठीं मानपत्रें—एक कलकत्त्याचें एक दिल्लीचे, एक त्यांच्या मायभूमींतले... अशी पांच सहा तरी मोठ्या दिमाखानें सांगत होतीं 'अरें या तपस्येपुढें आम्ही नतमस्तक झालों आहोंत!' डाव्या बाजूच्या कोंपऱ्यांतल्या एका बैठ्या कपाटांत एक भली मोठी चांदीची वीणा दिमाखानें बसली होती. मधल्या कप्प्यांतला सोन्याचा तंबोरा माझ्या डोळ्यांतल्या बाहुलीवर झोत टाकीत होता. आणि सर्वांत वरच्या कप्प्यांत जिथें एका मखमलीच्या चौकटींत कित्येक सुवर्ण पदकें होतीं तिथेंच राष्ट्रपतींनीं दिलेली सनद सांगत होती! "—कलेचा दिव्य स्पर्श झाला आहे तो इथे!"

मीं गारेगार झालों होतों. आतां संगीता-वर बोलायची माझी ताकद पार दडपून गेली होती. तो विषय निघाला असता तरी एक अक्षरही बोलायचें नाहीं अशी मनांतल्या मनांत मीं भीष्म—प्रतिज्ञा केली. त्याप्रमाणें आम्हीं सगळे हवापाण्याच्या, तब्येतीच्या गोष्टीं करतां करतां गोव्यांत उतूं जाणाऱ्या, खणून काढल्या जाणाऱ्या संपत्तीवर येऊन ठेपलों होतों. विषय मोठा रसाळ होता. आमच्यापैकीं एकानें गोव्यांत जाणाऱ्या वृत्तपत्रांची माहिती विचारली आणि विषय वृत्तपत्रांवर येऊन थडकला. त्यांतल्या, बातम्या, लेख, गोष्टी, टीका...हो, टीकेचा विषय चालू होता. संगीतावर येणाऱ्या परीक्षणवजा पोरकट टीकेबद्दल बाईंनीं हळूच नापसंती व्यक्त केली. आणि इथें वादाला तोंड फुटलें.

"गेल्या महिन्यांत झालेल्या माझ्या एका





गाण्यांत मीं 'कोमल ऋषभाची आसावरी' गायलें असें लिहिलें आहे; पण ती चूक होती." बाई म्हणाल्या.

"मीं लिहिलेलें नाहीं तें परीक्षण. दुसऱ्यानें लिहिलेलें आहे," मी समर्थन केलें. "पण तुम्हीं काय गायलांत तें सांगाल काय?" मीं दबकत दबकत म्हणालों.

"हा होता कीं, याला विचार!" सीतारामकडे बोट करून बाईनीं तो विषय टाळायचा प्रयत्न केला, पण झरा हळू हळू ओझरूं लागला होता.

"त्या दिवशीं तुम्हीं गायलांत ती गांधारी होती ना?" मी म्हणालों.

"हो! तुला कसं कळलं?"

विषय रंगांत येऊं लागला होता. बोलतां बोलतां गांधारींतले एकदोन प्रकार मलाहि येत असल्याचें सीतारामनें सांगून टाकलें.

"असं! मग म्हणू तरी. बघूं कशी काय आहे ती तुझी गांधारी!"

"पण तुम्हीं मागाहून त्या दिवशींची चीज म्हणून दाखवली पाहिजे हं." थोड्याशा नम्रतेनें पण अट लादून मीं म्हटलें. आतां मात्र बाईंचा नाइलाज झाला होता. वात्सल्यानें कां होईना बाई कबूल झाल्या होत्या.

माझ्या किरकोळ ज्ञानाचा आधींच प्रस्ताव करून, मीं माझ्या किरट्या थरथरल्या आवाजानें, ते गांधारींतले दोन प्रकार बाईंना ऐकवले. बाईनीं माझें कौतुक केलें. क्षणभर डोळे मिटून कसली तरी आठवण केली. आणि आकार लावून त्यांनीं गांधारीची अस्ताई मांडायला सुरुवात केली. जणुं सामवेद पूर्णावतार धारण करून आमच्यासमोर उभा होता. ती चीजहि अशी होती कीं एखादा देदिप्यमान असा जडावाचा दागिना मखमलीची पेटी उघडून आमच्या समोर ठेवलेला आहे. साक्षात्काराचा असा दिव्य क्षण पुन्हा केव्हां येईल तो सुदिन.

आरोहांतला शुद्ध ऋषभ मनावर 'जिवनपुरीची' सांवली कोरतो न कोरतो तोंच अवरोहांतला कोमल ऋषभ ती सांवली पुसून टाकून गांधारीच्या उजेडाचा कवडसा टाकी. अंत्रा संपला आणि बाईनीं हंसून आमच्याकडे पाहिलें; माझे डोळे पाणावले होते. त्या निष्ठावंत तपस्येसमोर आपोआप अश्रुफुलें वाहिलीं जात होतीं. आतां बाई रंगांत आल्या होत्या. आपल्या ज्ञानभांडारांतून एक एक गोष्ट त्या खुशी करूं लागल्या. आणि मग 'आसावरी' झाली. 'कोमल ऋषभाची' आसावरी' झाली. ज्याला आम्हीं 'देशी' समजत होतों ती 'हुसेनी तोडी' झाली. 'विलासखानी तोडी' झाली. देशींतले कांहीं प्रकार झाले. मधून मधून खाँ साहेबांच्या कांहीं आठवणीही निघाल्या.

"असे इथं, इथं खाँ साहेब फेऱ्या घालायचे. नुसत्या बोटांनीं इशारा करायचे, कीं माझी एकेका तानेची मेहनत दीड दीड तास अव्याहत चालायची. एकेका रागाची मेहनत सहा सहा महिने चालायची. शेवटीं खाँ साहेब कंटाळायचे! म्हणायचे 'बाबा दुसरा राग घे?' पण खाँसाहेब मला अमुक राग शिकवा असं मी आपण होऊन कधींहि सांगितलं नाहीं, रागाचं नांव विचारलं तर त्यांचा अपमान होईल म्हणून तेंहि कधीं विचारलं नाहीं."

"नसती चर्चा कधीं केली नाहीं. नसत्या उठाठेवी केल्या नाहींत. गुरुनी जें आणि जसें सांगितलें तसेंच ते ग्रहण केलें. आणि आतां तुम्हीं केशरबाईनीं गाण्याच्या आधीं राग सांगावे असें आवर्जून सांगतां. गाणं ऐकायला समोर बसलेली एखादी विशींतली पोर माझ्या तानेचं नोटेशन लिहून घेते, आणि स्वतःच्या तानेशी ती ताडून पाहून 'केशरबाईची तान बरोबर नाहीं राग नियमाला धरून नाहीं' असं स्वच्छ सांगत सुटते. या पोरांना काय म्हणावं? याचा मला केव्हां केव्हां प्रश्न पडतो! पण जाऊं द्या!"

विषयाचें वारडें गंभीरतेकडे सुरूं लागलें तशी मी म्हणालों. बाई तुम्हीं त्या दिवशीं 'गझलची भैरवी' कीं, काय म्हटली होती ती जरा दाखवा हो! बाई लो ग्यो हंसल्या त्या म्हणाल्या "बेट्या 'गझल' आम्हीं कधींहि गात नाहीं, खरं म्हणजे घरंदाजी गायक कधींहि गझल गाणार नाहीं. गझल हा एक कवालींतला ढंग आहे." असें सांगून त्यांनीं तो प्रकार कसा असतो याचें दिग्दर्शन केलें. आणि म्हणाल्या—

"ऐक. मीं त्या दिवशीं भैरवी गायलें ना, ती पूरब ढंगाची—मला 'भैयासाहेबांनीं दिलेली—भैरवींतली ठुंबरी होती. ज्यानें गायकलेसाठीं राज्यावर लाथ मारली, आणि भणंगाचें जीवन पत्करलें, त्या पुण्यात्म्याची आठवण म्हणून ती ठुंबरी मीं गायलें.!"

आणि त्यांनीं ती भैरवी आम्हांला म्हणून दाखविली. एक प्रकारें तो पूर्ण जलसाच झाला होता. ध्यानींमनीं नसतांना अकस्मात सारें कांहीं जुळून आलें होतें. ज्याची चर्चा करायला आम्हीं घाबरत होतों, व जें करायचें नाहीं अशी थोड्या वेळापूर्वी मी भीष्म प्रतिज्ञा केली होती तें सर्व योगायोगानें होऊन गेलें होतें. रात्रीचे साडेनऊ वाजले आणि आम्हांला जाग आली. बुद्धीच्या चक्षुंना आणखी कांहीं अधिक पेलणार नव्हतें. जेवढें मिळालें त्याची सांठवण करून त्या तपोमूर्तिला वंदन करून आम्हीं निघालों. ते धुंद क्षण फिरून फिरून आठवतात. आणि पुनः पुन्हां तसे क्षण यावेत याबद्दल मन आराधना करतें!

• • •










( पान १० वरून )

घेतली पाहिजे व दारूबंदीच्या सरकारी प्रसिद्धीखात्यानें शांता आपटे व त्यांच्या एकच प्याल्याचे ( एस्. ए. कन्सर्नच्या सोजन्यानें ) गांवोगांवीं प्रयोग करून दारूबंदी यशस्वी करावी आणि त्याबरोबर ह्या झांकल्या नाट्यरत्नाच्या गुणांची तमाम महाराष्ट्राला जाणीव करून द्यावी." असें प्रस्तुत लेखांत त्यांनीं गंभीरपणें सुचवलें आहे.

बाबुराव पटेलांचा प्रस्तुत प्रदीर्घ लेख संपूर्णपणें अनुवादित करणें स्थलाभावीं अशक्य आहे. तरीं पण त्याचा सारांश मी त्यांच्याच शब्दांत दिलेला आहे. बाबुराव पटेलांना मागील घटनेचा विसर पडून त्यांनीं शांता आपट्येचे गुणगान सुरू केलें आहे, हे फिल्म 'इंडिया'च्या आजच्या खरखरित आणि पिवळसर व्यक्तिमत्वाला साजेसेंच आहे. पण हें करण्याच्या भरांत त्यांनीं नाट्यतपस्वी बालगंधर्वांना जो अन्याय केला आहे त्याची दखल घेणें प्राप्त आहे. बाबुरावांनीं स्वतःच तयार केलेल्या ' शिवशक्ती 'चा खुराक चालू केल्यापासून त्यांना एकदम नवी दृष्टि आलेली आहे. आणि त्यामुळें शांता आपटे त्यांना गोंडस, कोकिळकंठी आणि नाट्यनिपुण वाटूं लागल्या आहेत. बालगंधर्व आज वृद्ध झालेले आहेत आणि त्यांचें नाट्यदर्शन आजच्या पिढीला होण्याचा संभव नाहीं. तसेंच त्यांची जाहिरात डबघाईला आलेल्या फिल्म ( कीं मदर ) इंडियाला मिळण्याचा सुतराम् संभव नाहीं. हें ओळखून मायावी शांता आपटेची त्यांना एकदम कां स्तुति करावी लागली हें व्यावहारिकच आहे. पण गंधर्वांच्या नाट्यगुणाचे मूल्यमापन योग्य तऱ्हेनें करणाऱ्या श्री. वसंत देसायांचे ग्रंथ जरी चालू पिढीनें वाचले तरी सुद्धां मराठी रंगभूमीच्या ह्या नाट्यकौस्तुभाच्या गुणांचे स्वरूप तिला आकलन होईल. अजूनहि गंधर्वांचे संगीत व नाट्य त्यांच्या ऐन अमदानींत रसास्वाद घेतलेले रसिक प्रेक्षक जोंपर्यंत हयात आहेत, तसेंच जोंपर्यंत खुद्द बालगंधर्व आपल्या स्वरमाधुर्याची प्रचीति देण्यास समर्थ आहेत, तोंपर्यंत बाबुराव पटेलांचे अगर त्यांच्या शागिर्दाचें मत कोणीहि विश्वसनीय समजणार नाहीं. बाबुराव पटेलांनीं ह्या वयांत संगीतशास्त्र व नाट्यकलेचा अभ्यास करून त्या विषयावर अधिकृत मत जाहीर करण्याइतकी तयारी दाखवली यांचें कदाचित् कुणाला आश्चर्य वाटेल. कारण ह्यापूर्वीं अनेक वेळा आपल्या नियतकालिकांत ह्या कलांना त्यानी नांवें ठेवलेलीं वाचकांना माहित आहेत. होमिओपाथीवरचें त्यांचे तज्ञ लिखाण आणि स्वामी शिवानंदाकडून प्राप्त केलेल्या योगिक सामर्थ्याची त्यांची आत्मस्तुति यांनीं फिल्मइंडिया याचे वाचक भारावून जातील. ह्या विषयांवर त्यांनीं लिहून आपली झाकली मूठ बंद ठेवावी. मराठी नाट्यकलेचा जर त्यांना कणव आला असेल आणि दारूबंदीबद्दल एकदम जर त्यांनां प्रेम फुटलें असेल तर त्यांनीं तें इतक्या उघडपणें जाहीर करण्याचें धाडस करूं नये. कारण तें मत पचवण्यासाठीं त्यांच्या ' शिवशक्ती ' टॉनिकच्या अनेक बाटल्या वाचकांना फुकट वाटण्याची पाळी त्यांच्यावर येईल. उद्यां याच आवेशांत त्यांनीं शांता आपटेच्या कंपनींत नाईटसूवर एकच प्याल्यांत सुधाकराची, स्वयंवरांत कृष्णाची आणि भावबंधनांत घनश्यामची भूमिका करण्याचें ठरवलें, तर त्यावेळी गणपतराव बोडस व चिंतामणराव कोल्हटकर हे किती टाकाऊ होते व अभिनय फक्त पटेलानाच करतां येतो हें त्यांच्या शागिर्दा करवीं त्यांना जाहिर करावें लागेल. प्रस्तुत लेख आपल्या शागिर्दाकरवीं लिहून घेऊन ' त्यांतल्या विधानांशीं आपण सर्वस्वी सहमत आहोंत असें नव्हे' अशी संपादकीय टीप देऊन पुढेंमागें जपमाळ उलटी फिरवण्याचा हक्क बाबुरावांनीं राखून ठेवला आहे, यापेक्षां आणखी त्यांच्या नाट्यकलेचा दुसरा पुरावा कशाला पाहिजे ?

—सारस्वत

## समाजकारण

### दत्तो वामन पोतदार

महाराष्ट्राचे एक विद्वान इतिहास संशोधक महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार यांना गेल्या महिन्यांत एकाहत्तरावें वर्ष लागलें. जुन्या पिढीतील निष्ठावान, चारित्र्यवान आणि व्यासंगी अशा विद्वत्तेचा पोतदार म्हणजे एक दुर्मिळ अवशेष. गेल्या तीन तपांतील महाराष्ट्राचें राजकारण, समाजकारण आणि साहित्य या तिन्ही आघाड्यांवर पोतदार स्वतःच्या आगळ्या वैशिष्ट्यानें चमकले. इतिहास संशोधन हा पोतदारांचा राखीव प्रांत. पण वाङ्मय हा त्यांच्या प्रेमाचा विषय. त्यामुळें दरवर्षी प्रत्येक साहित्यसंमेलनाला एखाद्या कडव्या बारकऱ्याप्रमाणें हजर राहून त्यांनी मैदान गाजविलें. पोतदारांची वाणी खणखणीत आणि धारदार. त्यांच्याइतका खडे आणि फर्डे मराठी बोल ऐकवणारा ब्राह्मण आजकाल शोधून सांपडायचा नाहीं. हरदासी वेष असला तरी पोतदारांचें विवेचन पायघोळ नसतें. ते मुद्याला धरून बोलतात आणि विषयांतर टाळतात. आणि यामुळें साहित्यसंमेलनाच्या खुल्या अधिवेशनांत काय किंवा विषयनियामक समितीच्या सभेंत काय, पोतदारांची उपस्थिती कोणत्याहि अटीतटीच्या समरप्रसंगीं समझोता करावयास उपयोगी ठरते. आणि यामुळें गेल्या तीस वर्षांत महाराष्ट्रांतील अशी एकहि संस्था नसेल कीं जिचें व्यासपीठ कोणत्या ना कोणत्या निमित्तानें पोतदारांनीं भूषविलें नाहीं. तात्यासाहेब केळकरांनंतर महाराष्ट्रांतील समारंभांची शोभा पोतदारांनीं कायम ठेवली.

गोष्टीवेल्हाळ पोतदारांना लिखाणाचा कंटाळा आहे. प्रा. नं. र. फाटकांप्रमाणें पोतदारांची बैठक अशी कांहीं रंगते कीं एखाद्या कसलेल्या खांसाहेबाच्या मैफलीलाहि लाज वाटावी. पण अशा मैफलींतच सदैव मशगूल असल्यामुळें पोतदारांनीं लेखणीची नेहमींच उपेक्षा केली. ' मराठी गद्याचा इंग्रजी अवतार ' हें त्यांचे एकुलतें एक पुस्तक, पोतदार आणखी लिहिते तर मराठी वाङ्मय किती संपन्न झालें असते याची साक्ष पटवून देण्यास समर्थ आहे.

महाराष्ट्राचे योजक ( ' धूर्त ' नव्हे ) मुख्यप्रधान श्री. यशवंतराव चव्हाण यांनी आतां पोतदारांना शिवचरित्राच्या कामी वेठीला धरलें आहे ही खरोखर भाग्याची गोष्ट. पोतदार म्हणजे ऐतिहासिक ज्ञानकोशच. पण महाराष्ट्रानें आतां त्यांना सभासंमेलनापासून दूर ठेवलें पाहिजे. कारण त्यांतच मराठी साहित्याचे आणि इतिहास संशोधनाचें कल्याण आहे.

### कै. फिरोज गांधी

गेल्या महिन्यांत खासदार फिरोज गांधीं




यांचे झालेलें आकस्मिक निधन म्हणजे भारतीय लोकशाहीचें झालेलें अपरिमित नुकसान. भारतीय संसदेंत फिरोज गांधी-सारखीं माणसें खरोखरच दुर्मिळ. ज्वलंत कॉंग्रेसभक्त असूनसुद्धां फिरोज गांधींनीं सत्ताधारी पक्षाच्या अन्यायाची आणि वशिलेबाजीची कधींच गय केली नाहीं. जीप प्रकरण, मुंदडा प्रकरण, यासारख्या भानगडी जनतेच्या न्यायासनासमोर खेंचण्याचें कठिण कार्य फिरोज गांधींनींच केलें. विरोधी पक्षीय खासदारांशीं फिरोज गांधींचे असलेले स्नेहसंबंध अनेक वेळां अनेक पेंचप्रसंग सुटावयास मदतरूप ठरले आहेत. संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न, सरकारी नोकरांचा प्रश्न याबाबतची समझोता करण्याची फिरोज गांधींची आत्मीय धडपड कुणालाच विसरतां येणार नाहीं. त्यांच्याकडे असामान्य वक्तृत्व नव्हतें. पण कोणताहि प्रश्न त्याचा सांगोपांग अभ्यास केल्याशिवाय आणि आकडेवारी-शिवाय त्यांनी मांडलाच नाहीं. पुराव्याशिवाय त्यांनी कोणतेंहि विधान कधींच केलें नाहीं. त्यामुळें आमच्या संसदीय राजकारणांत गांधींची उणीव सदैव भासत राहील.

### डॉ. मोक्षगुंडम् विश्वेश्वर अय्या !

भारताचे महान् यंत्रविशारद, उद्योगपति आणि मुत्सद्दी डॉ. मोक्षगुंडम् विश्वेश्वरअय्या यांना सप्टेंबरच्या १५ तारखेला नव्वाणवावें वर्ष लागलें. भारताच्या सर्वांगीण प्रगतीच्या प्रत्येक क्षेत्रांत ज्यांच्या बहुमोल कार्याचा फार मोठा वांटा आहे असा महापुरुष, असें विश्वेश्वर अय्या यांचें वर्णन करतां येईल. विश्वेश्वर अय्यांची कारकीर्द नाशिक जिल्ह्यांत सुरू झाली. त्याचवेळीं त्यांना न्यायमूर्ति रानड्यांचा आशीर्वाद मिळाला आणि कै. गोपाळराव गोखले यांचा पाठिंबा आणि तात्यासाहेब केळकरांचा स्नेह यांच्या जोरावर विश्वेश्वर अय्यांचें भवितव्य दिवसेंदिवस उज्ज्वलच होत गेलें. पाणीपुरवठा प्रश्नाबाबतचा एक अधिकारी इंजीनीयर असा लौकिक त्यांनीं पुणें जिल्ह्यांत मिळविला आणि त्यामुळें सिंधमधील सक्कर धरणाचें काम त्यांच्यावर सोंपवण्यांत आलें. त्यानंतर मुंबई, कराची आणि नागपूरसारख्या नगरपालिकांनीं विश्वेश्वर अय्यांच्या मार्गदर्शनावरच आपलीं बरीच कामें पार पाडलीं. त्यानंतर विश्वेश्वर अय्यांनीं म्हैसूर राज्याचे प्रमुख इंजीनीयर म्हणून नेमण्यांत आलें. १९१२ मध्यें त्यांनीं पूर्ण केलेलें कृष्णराजसागर धरण म्हणजे धरणबांधकामाच्या कलेंतील एक अपूर्व असें कार्य गणलें जातें. त्यानंतर त्यांची नेमणूक म्हैसूरचे दिवाण म्हणून करण्यांत आली आणि आपल्या दिवाणगिरीच्या कारकीर्दींत त्यांनीं साऱ्या म्हैसूर संस्थानचें अंतरंगच पालटून टाकलें आणि भारतांतील एक अग्रेसर संस्थान असा सार्थ लौकिक म्हैसूरला मिळवून दिला.

त्यानंतर सारा भारत हेंच त्यांचे कार्यक्षेत्र बनलें. आणि भारताच्या पुनर्रचनेबाबतचें त्यांचें पुस्तक प्रसिद्ध झालें. याच ग्रंथांत त्यांनीं आर्थिक नियोजनाचा पुरस्कार केला होता.

आज ९९ वर्षांचे विश्वेश्वरअय्या अजूनहि कार्यमग्न आहेत. खूप काम करा, असा त्यांच्या जीवनाचा महामंत्र आहे. मी पुष्कळ काम करतों आणि दिवस संपला तरीहि माझें काम संपत नाहीं. असें नुकतेंच त्यांनी उद्‌गार काढले होते. १९५५ सालीं भारत सरकारनें त्यांना भारतरत्न हा किताब बहाल करून एका थोर पुरुषाचा यथार्थ गौरव केला. त्याच वर्षी पं. जवाहरलाल नेहरू यांनाहि हाच किताब देण्यांत आला. हा योगायोग लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

भारताच्या औद्योगिक क्रांतीचे जनक डॉक्टर विश्वेश्वर अय्या यांना दीपावलीचे अभिवादन !

**— पिनाकि**



### आसाममधील प्रक्षोभ

फाळणीनंतर झालेल्या प्रक्षोभाची आठवण यावी इतकें तीव्र भाषिक आंदोलन गेल्या महिन्यांत आसाममध्यें झालें. या दंगलींत एकूण हजार घरें नष्ट करण्यांत आलीं आणि त्यामुळें हजार कुटुंबें अनिकेत झालीं. त्यापैकीं ४ हजार कुटुंबियांनीं सरकारी मदतीनें तात्पुरतीं घरें बांधलीं. या पुनर्वसनहतीच्या कार्यासाठीं आसाम सरकारला एकूण १०७ लाख रुपये मदतीदाखल द्यावे लागले. दंगलग्रस्त विभागांतून एकूण ५५ हजार बंगाली लोकांनीं स्थलांतर केलें त्यापैकीं आतां चाळीस हजार लोक पुन्हां आपापल्या गावीं आले. आसाम सरकारनें या सर्व बंगाली लोकांना असा दिलासा दिला आहे कीं अल्पसंख्यांकांचे हितसंबंध सुरक्षित राहतील अशी त्यांनीं काळजी घ्यावी. शांतता प्रस्थापित करण्यासाठीं आसाम सरकारनें आतांपर्यंत ४ हजार लोकांना अटक केली व त्यांच्यावरील खटल्यांचें काम चालू आहे. ज्या सरकारी नोकरांनीं या काळांत आपलें कर्तव्य बजावण्याच्या कामांत हयगय केली त्यांची चौकशी करण्यासाठीं एका खास अधिकाऱ्याचीहि सरकारनें नेमणूक केली.

तरीपण यामुळें आसामच्या राज्यभाषेचा वाद संपलेला नाहीं. या प्रश्नाबाबत तडजोड करण्यासाठीं काचार, डोंगराळ जिल्हे आणि ब्रह्मपुत्रेच्या खोरें या भागांतील पुढाऱ्यांची एक परिषद बोलावण्यांत आली आहे. या परिषदेंतहि राजभाषेचा प्रश्न निकालांत निघाला नाहीं तर आपण मध्यसरकारचें मार्गदर्शन घेऊं असें मुख्य प्रधान छलिहा यांनीं जाहीर केलें.

## क्रीडा

### ऑलिंपिकमधील भारताची ससेहोलपट

अखेर व्हायचें तें झालें. पाकिस्ताननें एक गोलानें भारतीय संघाचें अजिंक्यपद हिसकावून घेतलें. आमची वृत्तीच इतकी राजकारणी बनली आहे कीं खेळांतहि आम्ही राजकारण विसरत नाहीं. आणि त्यामुळें वशिलेबाजी आणि राजकारण यांच्या कचाट्यांत सांपडलेला भारतीय हॉकीसंघ आपल्या जवळच्याच शेजारी खेळाडूंपासून पराभूत झाला यांत नवल तें काय ? पराभव झाला असला तरी भारतीय हॉकी मृत झालेली नाहीं-अशी प्रौढी संघाच्या मॅनेजरनें मारली आहे. पण आमचें राजकारण जोंपर्यंत मृत होत नाहीं तोंपर्यंत या असल्या बढाया अखेर निष्फळ ठरणार.

भारताचें आशास्थान मिल्खासिंग हाहि धांवण्याच्या अंतिम स्पर्धेत चौथा आला. आतांपर्यंत या क्षेत्रांत आम्ही कधींच अंतिम स्पर्धेपर्यंत आलों नव्हतों ही सत्यकथा लक्षांत घेतां मिल्खासिंगचा चौथा क्रमांक प्राप्तपरिस्थितींतहि अभिमानास्पद आहे असें म्हणावें लागेल.

**— नवरंग**

## महाविदर्भातील ख्यातनाम विदुषी व संशोधिका डॉ. दमयंती सरपटकर यांनी



माणसाला आयुष्यांत अनेक प्रश्न पडतात. आणि ते प्रश्न कुणाला विचारावेत असाहि त्याला प्रश्न पडतो. आपण आपले प्रश्न (प्रतिमहिन्याच्या दहा दिनांकापर्यंत) आम्हाला विचारा व त्याची खेळीमेळीनें दिलेली उत्तरें तितक्याच खेळीमेळीनें ऐकायची सिद्धता ठेवा. येथें घातलेली ही पाणपोई आहे. एरंडाचें गुऱ्हाळ नव्हे, हे सर्व त्रस्त तृषितांच्या ध्यानांत येईलच! दर महिन्याच्या सर्वोत्कृष्ट प्रश्न विचारणाऱ्या मार्मिक वाचकाला आम्ही पांच रुपयांचे पारितोषिक देणार आहोंत. ह्या महिन्यांतील सर्वोत्तम प्रश्नाबद्दल कु. शुभांगी सरपोतदार, पुणें हिला पांच रुपयाचें पारितोषिक देण्याचे ठरले आहे. त्यांना मनीऑर्डरीने पैसे पाठविले जातील.

# घातली ही पाणपोई.

कु. **शुभांगी सरपोतदार**, विश्रामबाग, पुणें

**प्रश्न — मामा वरेरकर यांनीं रेडिओवरील मुलाखतींत सांगितलें कीं आपण पोस्टांत काम करण्यापूर्वी मेडिकलला गेलों होतों. नॉनमॅट्रिक मनुष्य मेडिकलला कसा काय जाऊं शकतो? कां ही सुद्धां मामांची भव्य थाप समजावी?**

**उत्तर**— ही मामांची थाप नाहीं. कोणत्याहि कारकुनाला कायम करतांना मेडिकलला जावें लागतें. पोस्टांत अपवाद नसल्यामुळें मामांना मेडिकलला जावें लागलें.

श्री. **रमेश दास्ताने**, औरंगपुरा, औरंगाबाद

**प्रश्न — शैली म्हणजे काय?**

**उत्तर** — जी सामान्य वाचकाला प्रयत्नानेंसुद्धां एखाद्या साहित्यिकाच्या लिखाणांत प्रत्ययाला येत नाहीं तरीसुद्धां रसिक टीकाकाराला दूरदृष्टीमुळें त्या लिखाणांत प्रकर्षानें व वैशिष्ट्यपूर्ण पद्धतीनें नटलेली दिसते अशी वाङ्मयप्रकारातील एक अनावश्यक बाब.

सौ. **ललिता मधुकर वहुतुले**, रांजणगांव

**प्रश्न — बैलाना वशिंड केव्हां येते?**

**उत्तर**— बैल ग्रॅज्युएट झाला कीं त्याला एक वशिंड येतें व डबल ग्रॅज्युएट झाल्यास दोन येतात.

श्री. **मनोहर वेंडगिरी**. परळ, मुंबई

**प्रश्न — संततिनियमनाचा स्वस्त व परिणामकारक उपाय कोणता?**

**उत्तर** — खुल्या हवेंत उघड्यावर झोंपणें.

श्री. **रमेश कृष्णा ढोळस**, नंदुरबार

**प्रश्न — प्रेम हें आंधळें असतें हें खरें काय?**

**उत्तर**— सिनेमा थिएटरच्या काळोखांत, फॅमिली रूमच्या एकांतांत अगर संध्याप्रकाशांत एखाद्या बागेच्या निर्जन कोपऱ्यांत वास्तव्य करून असणारें प्रेमिक ज्या तऱ्हेनें चांचपत राहातांना आढळतात त्यावरून प्रेम हें आंधळें असावें असें वाटतें.

**प्रश्न — कपडे घट्ट घातले तर पुरुषाला बेचैन वाटतें पण स्त्रियांना घट्ट कपड्यांशिवाय करमतच नाहीं हें कसें?**

**उत्तर**— घट्ट कपडे घातले तर पुरुषाचें रुधिराभिसरण थांबून तो घामाघूम होतो, या उलट घट्ट कपड्यांमुळें स्त्रीचा अभिसार जास्त सुलभ होतो.

श्री. **विनायक सोमण**—पुणें

**प्रश्न — विधिमंडळ म्हणजे काय?**

**उत्तर**— जनतेच्या पैशाचा विधिपूर्वक अपव्यय कसा करावा ह्याची चर्चा करण्यासाठीं जनतेनेंच निवडून दिलेल्या आत्मसंतुष्ट रिकामटेकड्यांचा क्लब.

श्री. **सदानंद श्रीधर नेमाडे**, मालवण

**प्रश्न — व्यंगचित्र म्हणजे काय?**

**उत्तर**— होतकरू चित्रकाराला जें चित्र नीट काढायला जमत नाहीं व जें प्रसिद्ध झाल्यावर चित्रकाराचें हंसें होतें त्याला व्यंगचित्र म्हणात.

श्री. **नटवर जोशी**, मुंबई.

**प्रश्न — क्रिकेट, सिनेमा, कला, वाङ्मय इत्यादि विषयांवर निरस लेखन करणारे एक स्तंभलेखक आतां राजकारणावर कां लिहूं लागले आहेत?**

**उत्तर**— "राजकारण हें बदमाष लोकांचें शेवटचें खेळणें असतें" अशी एक इंग्रजी म्हण आहे.

**प्रश्न — प्रशस्तीपत्रक म्हणजे काय?**

**उत्तर**— विसंगत शब्दांच्या फुलोऱ्यांत रचलेली एक निरर्थक व अनावश्यक आरती.

कु. **वनिता दशपुत्रे**—बुलढाणा.

**प्रश्न — बुशकोट, पांचवारी पातळे व कांचोळ्या ही कपड्यांची फॅशन लोकप्रिय कां झाली?**

**उत्तर**— हल्लीच्या जागेच्या टंचाईमुळें नऊ वारी लुगडीं, जाड कापडाचे कोट इत्यादि कपडे घरीं वाळण्यास जागा अपुरी पडते. तसेंच पाण्याच्या टंचाईमुळें शक्य तितके सुटसुटीत अथवा न धुतां स्वच्छ दिसणारे कपडे वापरणें इष्ट ठरतें. म्हणून हे कपडे लोकप्रिय आहे, फॅशन म्हणून नव्हे.

**प्रश्न — वाक्यांत विरामचिन्हें असण्याची काय आवश्यकता आहे?**

**उत्तर**— शब्दांच्या मागून धांवणाऱ्या अर्थाचा आणि वेडेवांकडे धांवणाऱ्या विचारांचा अपघात होऊं नये म्हणून जागोजागीं ठेवलेल्या वेगरोधक फलकांना विरामचिन्हें म्हणतात.

श्री. **वसंत अमृत सरवटे**, नागपूर.

**प्रश्न — कवीची समाजास काय जरूरी आहे?**

**उत्तर**— अभिजात कवि हा किड्यांतून रेशमी वस्त्रें विणणारा एक कोष्टी असल्यामुळें त्यानें निर्माण केलेल्या पारदर्शक वस्त्रांतून पलिकडची रूक्ष सृष्टि रम्य दिसूं लागते. आधुनिक उर्फ नवकवि हा मात्र पाथरवट आहे आणि तो घडवीत असलेली कलाकृति नेहमीं असंबद्ध व अपूर्ण राहत असल्यामुळें समाजाच्या सौन्दर्यसृष्टीस त्याचें कार्य उपयुक्त नसतें. उलट छिन्नीच्या आवाजानें येणाऱ्या जाणाऱ्यास त्याचा उपद्रव मात्र होतो.

हें मासिक श्री. दीनानाथ दलाल यांनीं न्यू भारत प्रिंटिंग प्रेस, ६, केळेवाडी, गिरगांव, मुंबई ४ येथें छापून



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका







